ग्रामीण प्रकाशन : १०

# पतीचा खून



मराठींत अभिनव प्रयोगाचें

रम्यभीषण

आणि

चित्तथरारक

तीन अंकी

संगीत

सामाजिक

नाटक



: लेखक :

म. भा. भोसले

: प्रमुख विक्रेते :

जोशी ब्रदर्स, बुकसेलर्स अँड पब्लिशर्स

अप्पा बळवंत चौक, पुणें २

## महत्त्वाची सूचना :

या नाटकासंबंधीं सर्व प्रकारचे हक्क मीं माझ्याकडे राखून ठेविले आहेत. या नाटकाचें भाषांतर, रूपांतर, चित्रपट, ध्वनिमुद्रण आदीं-साठीं आणि कुठल्याही नाटक मंडळीला अगर मंडळाला याचे प्रयोग रंगभूमीवर खाजगी वा जाहीर रीतीनें कसेही करावयाचे असल्यास, त्यासाठीं माझी लेखी परवानगी घेतलीच पाहिजे ! परवानगीशिवाय प्रयोग केल्याचें आढळल्यास कायदेशीर इलाज विनाविलंब केला जाईल.

—म. भा. भोसले

दि. ७।११।५३ भिलवडी, जि. सातारा.

★ ★ ★

प्रकाशक : चिटणीस,
ग्रामीण प्रकाशन संस्था
भिलवडी, जि. सातारा.

★ ★ ★

मुद्रक : मा. कृ. सहस्रबुद्धे,
धनी, श्रीज्ञानेश्वर प्रेस, कोल्हापूर.

★ ★ ★

माझे

कलावंत स्नेही

कविवर्य

सुधांशु

आणि

नटवर्य

गोपाळ बकरे

यांस.

## श्री. म. भा. भोसले यांचें वाङ्मय :

कादंबरी :

समरांगण
उघड्या जगांत
एका आईचीं लेकरं

कथा :

गार सावली
नांदाय जाते
अहेव लेणं

नाटक :

रक्ताचं नातं
पतीचा खून

चित्रपट :

जिवाचा सखा

इतर :

आधुनिक वाङ्मयप्रकार
चिमण चारा
न यायच्या वाटेवर
उगवते तारे
आमची वाडी
काळीचा कोप
जातीला जागा नाहीं

श्री. म. भा. भोसलेकृत

मराठी नाट्यवाङ्मयांत सर्वस्वी अभिनव असें

संगीत नाटक

# पतीचा खून

पद्यरचना—सुधांशु

# पहिला अंक

## [ रात्रीं १०॥ वाजतां ]

[ मुख्य पडदा वर जातो ! रंगभूमीवर पूर्ण काळोख आहे. त्या काळोखांत एक व्यक्ति प्रवेश करते. ती व्यक्ति काडी ओढून दिवा शोधते, दिवा सांपडल्यावर तो उजळते. त्या उजेडांत " गंगाराम जलसेवाला " स्पष्टपणें ओळखूं येतो ! त्याच्याच घरांतली ती उठण्याबसण्याची व झोपण्याची खोली ! प्रेक्षकांच्या डाव्या हाताला बाहेर जाण्याचें दार; उजव्या हाताला आंत जाण्याचें दार; मध्यभागीं चार पांच फूट उंचीवर बिनगजाची एक खिडकी आहे. ती बंद आहे. डाव्या बाजूच्या कोपऱ्यांत एक जुना लाकडी पलंग आहे. त्यावर सतरंजीमध्यें गुंडाळलेली गादी ! मध्यभागीं " गंगाराम पेटीवाला " अशीं अक्षरें असलेली पायपेटी ! बाजूला तबला, ढोलकें, पायांतील चाळ, भिंतीवर तमाशांतल्या दोन तीन फाकड्या पोरींचे

फोटो, तसेंच देशी विदेशी नटनटींचे फोटो किंवा सिनेमाचीं पोस्टर्स ! मात्र मध्यभागीं "विठ्ठल–रखुमाई"चा हार घातलेला फोटो. एकंदर सजावट ही अशी आहे. गंगाराम जुन्या नटाप्रमाणें केसाळ आहे. कपड्यांचंही तसंच ! तो धोतर नेसला आहे. अंगांत भडक रंगाचा शर्ट, काळं जाकिट, चोर बाजारांत घेतलेला उलनचा कोट, डोक्याला फरची उंच टोपी, गळ्याला मफलर असा हा सुमारें २६।२७ वर्षे वयाचा, किरकोळ बांध्याचा, गाल वगैरे जाग्यावर असलेला बरा सद्‌गृहस्थ आहे. तो रंगभूमीवर प्रवेश करतो, त्यावेळीं तोंडानं एक शृंगारपूर्ण अशी जुनी लावणी गुणगुणत असतो. कपडे करीत असतांनाच त्याचा सूर लागतो. खड्या आवाजांत तो म्हणतो. मोठ्या खुषींत आहे तो ! एकंदर तयारीवरून स्वारी बाहेर जाण्याच्या तयारींत आहे. रात्रीं दहा अकराचा सुमार आहे. पडदा वर गेल्यापासून वातावरण प्रसन्न होण्यासारखं पार्श्वसंगीत सुरू आहे. पायांत वहाणा घातल्यानंतर लावणीचे शेवटचे चरण संपण्यापूर्वीच, त्याची बायको मैना प्रवेशते. घरांतलं सर्व कामधाम आटोपून ती झोपण्याच्या तयारीनं आलेली असते. नवऱ्याला अशा अपरात्रीं बाहेर जाण्याच्या तयारींत पाहून तिच्या चेहऱ्यावर आश्चर्य दिसतें ! तमासगिरांच्याच पेशांतली ती आहे. बावीस तेवीसच्या दरम्यान वय. नुक्ताच तिनं तमाशाचा पेशा सोडून देऊन आपल्या साथीदाराबरोबर–गंगारामाबरोबर–विधिपूर्वक लग्न केलं आहे. दिसायला मोठी तरतरीत ! शीलवंत म्हणून आयुष्य जगण्याची तिची जबर महत्त्वाकांक्षा. चारपांच हजार वस्ती असलेल्या एका खेड्यांत अपरात्रीच्या वेळीं या नाटकाची सुरवात आहे. मैना लाडिकपणें गंगारामचा हात धरून विचारते— ]

**मैनाः**–हें काय बाई ! ही का बाहेर जायची वेळ ?

**गंगारामः**–मग काय, दिवसा बारा वाजतां बाहेर जायचं असतं ? अग, पुरुषांची बाहेर पडायची खरी वेळ हीच असते.

**मैनाः**–पण यावेळीं काय करणार बाहेर जाऊन ?

**गंगाराम**:—काय करणार? छे, छे! अग, तें का उघड सांगतां येईल? अन् तेंही आपल्या बायकोसमोर? बाकी, तुझ्यासारखीला तें कांहीं नवीन वाटणार नाहीं म्हणा!

**मैना**:—माझ्यासारखीला? म्हणजे मला समजतांय तरी तुम्ही कोण?

**गंगाराम**:—आतां तुला मी निराळं आणखी काय समजणार? अग, तूं माझी बायको. गळ्यांत मंगळसूत्र बांधून आणि मस्तकावर मंगलाक्षतांची खैरात करून घेऊन विधिपूर्वक झालेली माझी अर्धांगी. नाचण्यागाण्यांत तुझं आतांपर्यंतचं जीवन गेलं असलं तरी तूं आतां एक फस्क्लास बायको झाली आहेस. पण बायकी धर्माचे नियम मात्र पाळीत नाहींस.

**मैना**:—कसले नियम?

**गंगाराम**:—पुष्कळच आहेत. पण आतां तुला एकच सांगतों. हें बघ, चांगल्या बायकोनं नवऱ्याच्या कसल्याही बाहेरच्या भानगडीची चवकशी करायची नसते.

**मैना**:—छान! म्हणजे वळू बैलाला सगळं कुरण मोकळं सोडायचं, असंच ना? आणखी कोणते नियम आहेत?

**गंगाराम**:—हें बघ, मी कांहीं तुकाराममहाराज नाहीं. मला जें तुझं चुकतंय असं वाटेल तेवढं तुला सांगेन. पण खरं म्हणजे जर तुला कित्ता घेण्यासारखी बाई व्हायचं असेल तर तूं आपल्या गांवच्या इनामदारणीचा कित्ता समोर ठेवला पाहिजेस!

**मैना**:—कुणाचा? सगुणाबाईचा?

**गंगाराम**:—हो. खरी घरंदाज बाई आहे ती. नवऱ्याचा नादानपणा गांवभर मोकाट सुटला असला तरी तोंडांतून कधीं ब्र काढला नाहीं तिनं! खरी साध्वी बाई. प्रत्येकीनं कित्ता घेण्यासारखी आहे ती!

**मैना**:—चांगलं! म्हणजे तिचा कित्ता मी गिरवतें अन् तुम्ही तिच्या नवऱ्याचा आदर्श पुढं ठेवा म्हणजे भागलं. लवकरच आपणांला काडीमोड करायला मग कांहींच हरकत उरणार नाहीं!

**गंगाराम**:–पण जर तूं तिची रीत पाळलीस तर तसा प्रसंगच येणार नाहीं मुळीं ! त्यांचं कसं चाललंय बघ कीं. बाजीरावचा पाय कधीं घरांत ठरलाय का ? तो दारूच्या बाटल्या रोज फोडीत असला, सगळ्या गांवांतल्या बऱ्यावाईट बायका आपल्याच असं समजत असला आणि गांवभर त्याच्या बाहेरख्यालीपणाचा बोभाटा झाला असला तरी जोंपर्यंत सगुणाबाई शीलवान् बायको म्हणून त्या घरांत वावरत आहे तोंपर्यंत त्याचा सगळा चावटपणा झांकला जाणार आहे आणि घराण्याचा मोठेपणा कायम राहणार आहे. पुरुष बहकला तर कोणाचंच नुकसान होत नाहीं. पण बाई जरा जरी चळली तरी लाखमोलाचं घराणं मातीमोल व्हायला वेळ लागत नाहीं. म्हणून म्हणतों बायकांनींच खरं पायाशुद्ध वागायला पाहिजे.

**मैना**:–पण पुरुषांनीं पायाच निखळून काढल्यावर लाखमोलाचं घराणं मातीमोल व्हायला तरी कितीसा वेळ लागणार ? म्हणे बायकांनींच पायाशुद्ध वागायला पाहिजे; अन् पुरुषांनीं मात्र बाहेर शेण खाल्लं तरी चालेल, असंच ना ?

**गंगाराम**:–अग, अग ! भलतंच काय बोलतेस ? पुरुष बाहेर जाऊन अमृत पीत नसतील कशावरून ?

**मैना**:–अमृत काय ? मग सांगा बघूं, आतां कसलं अमृत तुम्हांला बाहेर मिळणार आहे ?

**गंगाराम**:–बकुळा मुरळीची नाचगाण्याची बैठक आहे आज !

**मैना**:–नाच आणि गाणंच ना ? मग तें मी रात्रंदिवस इथंच दाखवीन कीं तुम्हांला.

**गंगाराम**:–पण येतों कीं जाऊन मी लगेच ! तासभरच थांबेन. जास्त वेळ मुळींच लावणार नाहीं. मग तरी झालं कीं नाहीं ?

**मैना**:–तें कांहीं नाहीं. मी तुम्हांला मुळींच सोडणार नाहीं. [ त्याला ओढीत नेऊन पलंगावर बसविते. ] हं, बसा असे. अन् पहा नाच आणि ऐका गाणंही. अगदीं फक्कड लावणी...

**गंगाराम**:–अग, पण तूं मैना आहेस. मला बकुळेचं गाणं ऐकायचं होतं. आजच्यासारखा अडथळा मला कधींच झाला नव्हता. वाटेल तेव्हां नी वाटेल तिथं मी जात होतों. भल्यानं या लग्नाच्या भानगडींत पडूं नये रे बाबा! लग्न म्हणजे खोडा नव्हे, बेडीच हें कांहीं खोटं नाहीं.

**मैना**:–कां, अगदीं जखडल्यासारखं होतंय का? सत्तेचं घर न् सत्तेची बायको जर हवी तर सत्तेचा असा जुलूमही सहन केलाच पाहिजे. तुम्हांला आज बकुळेचं गाणं ऐकायचं नव्हतं तर तिला बघायची होती–खरं ना? पण संसारी पुरुषाला त्या गोष्टीची बंदी असते. त्यानं बघायचं असतं फक्त आपल्या पत्नीकडे. हं, बघा इकडे. [पायांत घुंगूर बांधून लावणी म्हणते–]

## लावणी नं० १

**तुझी–माझी जन्माची जमली जोड**
**तुझा राया, विफल रुसवा सोड**
**नवतीचीं पानें कवळीं**
**घेऊनी आलें जवळीं**
**रंगूं दे तुझा–माझा, प्रीतीचा विडा गोड**
**राया, तूं पक्षी–राजा**
**पाडाचा आंबा माझा**
**खुमारी चाख याची, कापून देतें फोड**
**बघ केवडा माझा फुले**
**नागांना भरले चाळे**
**शेषाचा तुझा महिमा, मोडील त्यांची खोड ॥**

[ गाणें संपतां संपतां ती त्याचे खांद्यावर मान टाकते. तो तिला कुरवाळीत म्हणतो— ]

**गंगाराम**:–मैना, माझी मैना! जन्मजात कोकिळा आहेस तूं. आज बैठकीपेक्षांही बहार उडविलास. चल, आतां खूपच उशीर झाला.

[ तो पलंगाकडे जातो. ती दिवा मालवते. अंधार होतो. तोंच बाहेरून दार ठोठावलें जातें व ' गंगाराम ' ' गंगाराम ' अशा हांका येतात. ' कोण आहे ? ' एवढं विचारून गंगाराम दाराकडे जाऊं लागतो. तेवढ्यांत मैना त्याला ओढून पलंगावर बसविते आणि स्वतः दाराकडे जाऊन विचारते—]

**मैनाः**—कोण हो ? कोण आहे बाहेर ?

**दिनकरः**—[ बाहेरून ] मी दिनकर. दार उघड मैना. माझं गंगारामाकडे काम आहे थोडंसं !

**मैनाः**—पण ते घरीं नाहींत. बकुळेची बैठक आहे ना कुठंतरी ? तिकडे गेलेत बघा ते मघांशींच !

**दिनकरः**—असं होय ? मग राहूं दे. हातचं सोडून पळत्याच्या पाठीमागें गेलाय म्हणायचा ! पण अशानं दोन्हीही हुकायचीं ! [ जातो. ]

[ मैना पलंगावर पडते. अंधारांत पुरुष उंचीची एक खिडकी बाहेरून आंत उघडली जाते. प्रकाशझोतांतून हीं दृश्यें दिसतात. त्यांतून प्रथम बाजीरावचें डोकें दिसतें. नंतर तो वर चढून त्या खिडकींतून आंत उडी मारतो. तो उण्यापुऱ्या उंचीचा, देखणा नी सुशिक्षित डाकूसारख्या सुटाच्या पोषाखांत असतो. त्याच्या उडीच्या आवाजानं गंगाराम ' काय पडलं ? ' म्हणून बाहेर येऊन पाहूं लागतो. बाजीराव बाजूला सरतो आणि तो टप्प्यांत येतांच त्याची मानगूट पकडतो. दोघांची झटापट होते. मैना दचकून किंकाळी फोडते. बाहेरच्या दाराची कडी काढून ती बाहेर जाण्याचा प्रयत्न करते. तोंच बाजीराव गंगारामला बाजूच्या खोलींत ढकलून कडी लावतो नी मैनाला पकडतो. ती ' चोर चोर ' म्हणून ओरडते. तो तिच्या तोंडावर हात ठेवून दटावतो—]

**बाजीरावः**—चूप, ओरडूं नकोस. चोर नाहीं. मी बाजीराव आहें.

**मैनाः**—कोण बाजीराव ? अन् अशा वेळीं ? काय पाहिजे तुम्हांला ?

**बाजीरावः**—मला तूं पाहिजेस. इथंच मला तूं हवी होतीस. पण आतां इथं जमायचं नाहीं. तुला बाहेर जायचं होतं ना ? चल मी नेतों,

माझ्या हक्काच्या घरीं. तिथं कुणाचाही अटकाव होणार नाहीं. चल. [ तिचा हात धरून तो तिला ओढतो. त्यांची झटापट चालू असतांना दिनकर येतो. ]

बाजीरावः–वारे मेरे दोस्त ! चोख काम बजावलंस ! फत्ते झाली.

दिनकरः–अरे दोस्ता ! आधीं याच्या घराचा कानोसा घेतला होता. गंगाराम घरांत नाहीं अशी खात्री करून घेतली, आणि तुला सांगून तो खिडकीचा रस्ता दाखविला. हें सर्व करून मग मी बकुळेच्या बैठकीला गेलों, तिथं तो लेकाचा गंगाराम दिसला नाहीं; तसा आतां तडक पुन्हां इकडे आलों. तो भाड्या, आंत घरांत बोंबलत असलेला ऐकला, आंत आलों तर तूं ही सर्व व्यवस्था चोख केलेली बघितली. छान ! आतां कसला लेकाचा बाहेर येतो ? पण हें बघ, आतां तूं इथं थांबूं नकोस. आटप, जा आतां तुझ्या राजमहालांतच हिला घेऊन; अँ ? [ तो जातो. ती आढेवेढे घेऊं लागते. तो तिला उचलून खांद्यावर घेतो नी चालूं लागतो. ती हातपाय झाडते. बाहेर पडल्यानंतर मधल्या पडद्यासमोरून ती किंचाळत असलेली अन् तो तिला खांद्यावरून घेऊन जात असलेला प्रकाश-झोतांत प्रेक्षकांना दिसतो. तेवढ्यांत आंतला फ्लॅट बदलून तेथें बाजीरावचा दिवाणखाना दिसतो. दोन दारें. पूर्ण प्रकाश होतो. बाजीराव तिला घेऊन दिवाणखान्यांत शिरतो. तिला एका कोचावर टाकतो. आपणही ' हुश्श ' करून तिच्यासमोरच्या कोचावर बसतो. ]

बाजीरावः–सुटलों एकदांचा. आतां कांहीं गडबड नाहीं. निवांतपणीं दोन गोष्टी बोलूंया. वाटल्यास एकादी लावणी म्हण. आणि मग...

मैनाः–[ करुण स्वरांत ] काय मग ? पाटील, मीं नुकतंच लग्न केलंय. बाजारबसवीसारखं नाचणारणीचं जीवन झुगारून मी कुलीन स्त्रीसारखा संसार करूं लागलेय. या चांगल्या गोष्टीला तुम्ही पाटलांनीं–गांवच्या मालकांनीं साथ द्यायची का तिचा असा विध्वंस करायचा ? आजपर्यंत मीं नाच-गाण्याचा धंदा केला तरी माझ्या स्त्रीत्वाला मीं धक्का लागूं दिला नाहीं.

केवळ नाचणारीण म्हणून माझ्याशीं लग्न करायलाच कुणी तयार नव्हतं, तो गंगाराम झाला. आतां अशा स्थितींत तुम्ही माझ्या शीलावर घाड घालाल तर माझा संसार उध्वस्त होईल, मला जीवनांतून कायमचं उठावं लागेल. पाटील, दया करा. सोडा मला; जाऊं द्या ! [ ती उठून उभी राहते. ]

बाजीराव:–हें बघ, असलं कांहीं ऐकायचं न् बोलायचं मला ठाऊक नाहीं. तुला इथं आणली ती तुझ्या तोंडून जीवनाचं तत्त्वज्ञान ऐकायला नाहीं. जीवनांतली मजा लुटायला. आणि तूं तरी कुलीनता, शील असल्या खोल पाण्यांत कशाला शिरतेस ? त्या गोष्टी आपल्याकरितां नाहींत. त्यांचा ठाव आपणाला लागायचा नाहीं. आणलीच आहे तुला इथं मीं. आतां घटकाभर दोघंही चैन करूंया. मग तुला तुझ्या घरीं–तुझ्या संसारांत सुखरूप पोंचवितों. मग तरी झालं कीं नाहीं ? हं, आटप. तूं घुंगुर आणले नसशील, नाहीं ? बरं, नसूं देत. म्हण तशीच एक लावणी. अशी फक्कड झाली पाहिजे कीं ज्याचं नांव तें !

मैना:–नाहीं, पाटील तें शक्य नाहीं.

बाजीराव:–कां ? मी आवडत नाहीं तुला ?

मैना:–खूप आवडतां. गांवचे धनी म्हणून. एका मोठ्या घराण्यांतले राजबिंडे पुरुष म्हणून.

बाजीराव:–मग या पुरुषाला खूष करायची इच्छा नाहीं तुझी ?

मैना:–एका पायावर आहे. पण पाटिलकीला काळिमा लावणाऱ्या या एकांतांत नाहीं. चला बाहेर, बैठक मांडा. एक म्हणतां दहा लावण्या म्हणून तुमची खुषी करतें.

बाजीराव:–तसली खुपी नकोय मला. ती हवी असती तर तुझ्याकडे कशाला आलों असतों ? त्या बकुळेच्या बैठकीला नसतों का गेलों ? मैना, जास्ती बडबडूं नकोस. मी म्हणेन तसं तुला इथं वागलंच पाहिजे.

मैना:–शक्य नाहीं. पाटील, मी एक लग्न झालेली स्त्री आहें.

बाजीराव:–अन् मी काय बैल आहे का घोडा आहे? मीही एक लग्न झालेलाच पुरुष आहें. पुरुषानं स्त्रीजवळ जें मागायचं त्याच्यापेक्षां निराळं तर मी कांहीं मागत नाहीं तुझ्याजवळ?

मैना:–फार निराळं आहे. जगावेगळं. नीतीला सोडून...

बाजीराव:–नीति-अनीतीचा जप करणाऱ्याला आयुष्यांतलं सुख कधींच मिळत नाहीं; आणि परमेश्वरानं स्त्रीपुरुषाची जोडी निर्माण केली ती एक-मेकांपासून दूर राहून दुःखाची जपमाळ घेण्यासाठीं नाहीं. तर परस्परांना बिलगून सुखाची फुलबाग फुलविण्यासाठीं!

मैना:–पण ती फुलबाग माझी न् गंगारामची अन् तुमची न् सगुणाबाईची फुललेली जास्त चांगली, नाहीं का?

बाजीराव:–अन् गंगारामऐवजीं मी असलों तर अगदीं कांटे बोच-तील का?

मैना:–तसंच तुमच्याऐवजीं सगुणाबाईकडे गंगाराम गेला तर?—

बाजीराव:–[ ओरडून ] मैने—

मैना:–कां? लगेच फुलाचे कांटे झाले ना?

बाजीराव:–तुला मी बाजारचा मेवा समजत होतों. पण अगदीं तिखट मिरची दिसतेस कीं! पण लक्षांत ठेव, माझ्याशीं गांठ आहे—गांवच्या पाटलाशीं. ऊठ. म्हण लावणी अगोदर.

मैना:–मी उठणार नाहीं. कांहीं म्हणणार नाहीं.

बाजीराव:–[ उठून तिच्याजवळ जात ] भलती मिजास दाखवूं नकोस. [ हात धरून उठवितो. ] ऊठ, म्हण लावणी.

मैना:–[ त्याचा हात झिडकारीत ] दूर व्हा, पाटील. मी कांहीं म्हणणार नाहीं. मला जाऊं द्या. मला सोडा.

बाजीराव:–सोडायची आतां आशा सोड. माझी इच्छा पुरी झाल्याशिवाय...

मैना:–मी पळून जाईन. [ जाऊं लागते. ]

बाजीराव:–मी अश्शी धरून ठेवीन. [ धरतो. ]

मैना:–मी आरडेन—ओरडेन—

बाजीराव:–घर माझं आहे. तुझ्या ओरडण्याचा कांहींही उपयोग होणार नाहीं !

मैना:–पण पाटील, घर आहे हें ! बाजार नव्हे, तमाशाचं थेटर नव्हे किंवा कुंटणखानाही नाहीं.

बाजीराव:–कांहींही समज. पण लावणी म्हटल्याशिवाय मी तुला सोडणार नाहीं. [ रागानें उठून तो तिच्या पायावर पाय दाबतो. ती किंचाळते. ]

मैना:–ईय...सोडा, सोडा मला. म्हणतें मी लावणी. [ म्हणूं लागते– ]

## लावणी नं. २

हात लावुं नको मला, माझा
प्रीतीचा पथ बंद जाहला
आपण होतों आजवरी बघ, नवथर अल्लड बाळें
नको कराया परंतु केले, अवखळ प्रीती-चाळे
पण आतां ती टळली वेळ
कसा करावा तसला खेळ
झालें घरधनीण मी आतां, बहर नवा आला
कुलिन घराणें असलें मोठें नसे जरासा बाट
कां असा मग त्वां मांडिला, आडवाटेचा थाट
नको घालुंस मला धाक
काशि सोडुं मी माझी साक
विधिबंधें बघ माझा आतां, हा जीव जखडिला ॥

[ लावणी संपायचे सुमारास बाहेर गंगाराम येतो. दार दणकतो व "मैना, मैना, राघुअण्णा, राघुअण्णा" असा त्याचा हांकांचा सपाटा सुरू होतो. ]

**बाजीराव**:–अरेच्या ! आली का ही ब्याद सुटून ? चल, आपण वर जाऊं. [ तिला कवळा घालतो. ती किंचाळते. तो आवाज ऐकून सगुणा आंतल्या दारांतून येते. ]

**सगुणा**:–कोण आहे ती ? सोडा तिला अगोदर–काय सांगतेंय मी ?

**बाजीराव**:–[ दटावून ] ऐकलं कीं तुझं सांगणं मीं. पण हातची शिकार सोडायला मी नामर्दाचा बच्चा नाहीं.

**सगुणा**:–मर्दपणाचे पोवाडे सगळया गांवभर गाजतायत् कीं ! त्यांत आणखी ही भर कशाला ? सोडा अगोदर तिला. [ त्वेषानं ] काय सांगतेंय मी ? घराबाहेर तुम्ही शेणांत लोळलां तरी पतीचा आब्र ठेवण्यासाठीं मी एका शब्दानं तुम्हांला बोललें नाहीं. पण त्याचा फायदा घेऊन घराबाहेरचा उकिरडा घरांत आणण्याइतके तुम्ही पागल व्हाल असं मात्र मला कधीं वाटलं नव्हतं. पण आज तें प्रत्यक्ष घडलं. डोळयावर कातडं ओढून बसण्याची वेळ निघून गेली. आतां याला वेळींच पायबंद घालायलाच हवा !

**बाजीराव**:–काय म्हणालीस ? पायबंद ? कोण तूं घालणार ? ह्यः ह्यः [ खो खो हंसतो. ] गांवच्या पाटलाला त्याची बायको पायबंद घालणार ? जगांत एक नवं नवलच होईल तें तुझ्या नांवचं !

**सगुणा**:–हो हो, मी घालणार ! उकिरड्याचं घर झालेलं चालतं. तें चांगलंच असतं. पण घराचा उकिरडा मी कधींही होऊं देणार नाहीं. निदान माझ्या डोळयांदेखत, माझ्यासमोर तरी हें मी होऊं देणार नाहीं.

**बाजीराव**:–काय करणार तूं ?

**सगुणा**:–मी ? [ तोंच आंतून सात आठ वर्षांचा मुलगा शिवाजी 'आई आई' अशी हांक मारीत येतो. त्याच्या आडवी जात सगुणा बोलते.]

**सगुणा**:–बाळ, बाळ, तूं कशाला उठलास ? हें पाहूं नकोस रे तूं ? [ त्याच्या डोळयावर हात ठेवून त्याला परत घरांत नेते. ] चल, झोंपवतें तुला.

**शिवाजी**:–[ वळून मागें पाहाण्याचा प्रयत्न करीत ] ती बाई कोण ? बाबानं तिला कां धरलीय ?

**सगुणाः**–[ हुंदका देऊन ] बाळ, नको, तें विचारूं नकोस. चल. [ त्याला घेऊन जाते. बाजीराव मैनाला वर ओढण्याचा प्रयत्न करतो. गंगारामच्या हांका चालूच आहेत. अशांत वरून जिन्यावरून राघुअण्णा येतात. त्यांना पाहातांच बाजीराव दबकतो व नरमून बोलतो ]

**बाजीरावः**–मैना, लाख वेळां तुला सांगितलंय कीं तूं माझ्या नादीं लागूं नकोस. आतां लग्न केलंयस्. संसारांत पडलीयस्. यापूर्वी तें ठीक होतं. पण आतां–जा तूं. गंगाराम आलाय वाटतं बाहेर. चले जाव. [ तो लगेच बाजूच्या खोलींत जाऊं लागतो. ]

**राघुअण्णाः**–[ अतिशय करारी आवाजांत ] बाजी, काय भानगड आहे ? थांब, सगळं सांगितल्याशिवाय जाऊं नकोस. [ पण तो थांबत नाहीं. चटकन् आंत शिरून खोलीला आंतून कडी लावून घेतो. ]

**मैनाः**–अण्णा, अण्णा, आज तुम्हीं माझ्या अब्रूचं रक्षण केलंत. तुम्ही नसतां तर—

**राघुअण्णाः**–काय, झालंय काय ? तूं कशी इथं आलीस ? [ बाहेरून गंगारामची 'अण्णा–' अशी हांक येते. ] ती कडी काढ अगोदर. [ गंगाराम बाहेरून आणि सगुणा आंतून येते. ]

**गंगारामः**–अण्णा, अण्णा, आम्ही या गांवांत राहायचं का तुमच्या भीतीनं गांव सोडून जायचं तें तरी एकदां आम्हांला सांगा.

**राघुअण्णाः**–अरे, पण झालंय काय तें सांगा मला अगोदर. मैना, तूं इथं कशी आलीस ?

**गंगारामः**–ती कशी आली तें हातांत काठी घेऊन तुमच्या त्या चिरंजिवालाच विचारा कीं !

**मैनाः**–अण्णा, मी आलें नाहीं. मला इथं ओढून आणलं पाटलांनीं !

**राघुअण्णाः**–कुठून ?

**गंगारामः**–आमच्या घरून. आम्ही दोघं झोंपलों होतों. एकाद्या चोरासारखा तो खिडकींतून घरांत उतरला. हाणामारी करून मला एका खोलींत कोंडलं आणि मैनेला उचलून घेऊन तो इथं आला.

**मैना:**–पण माझी वेळ बरी होती. इथं तुम्ही होतां म्हणूनच निभावलं. नाहींतर आज माझ्या जीवनाचा सत्यानाश होणार होता.

**राघुअण्णा:**–आतां मात्र हद्द झाली या कार्ट्याची! [ हातांतील काठी सावरीत बाजीराव असलेल्या खोलीकडे जातात आणि हांक मारतात. ] बाजी, [ काठी दारावर आपटून पुन्हां ओरडतात. ] बाज्या, बाज्या, बाहेर ये अगोदर! [ आंतून कांहींही उत्तर येत नाहीं. परत येऊन बोलूं लागतात. ] मैना, गंगाराम, मी तुमची माफी मागतों. आतां तुम्ही जा. मी त्याला पाहून घेतों. पुन्हां जर त्यानं कांहीं कमीजास्त केलं तर त्याची जबाबदारी माझ्यावर. जा तुम्ही. माझ्यासाठीं जा.

**गंगाराम:**–अण्णा, तुमच्याकडे, वहिनीकडे अन् तुमच्या घराण्याकडे बघून आजपर्यंत सगळं गांव गप्प बसलंय. पण बाजीराव सुधारायचं चिन्ह दिसत नाहीं. उलट तो जास्ती जास्तीच बहकत चाललाय. हें जर असंच चालू राहिलं तर एकाद दिवशीं असा प्रसंग येईल कीं तो तर निकालांत निघेलच. पण तुमच्यावरही पश्चात्ताप करायची पाळी येईल. [ दोघेंही जातात. ]

**राघुअण्णा:**–पश्चात्ताप! पश्चात्ताप करायची पाळी येईल. [ डोकें धरून ] येईल कसली? ती येणार हें ठरलेलंच आहे. पण हें कळत असून मला कांहीं करतां येऊं नये, बाजीला त्याची जाणीव असूं नये अन् एका तमासवाल्यानं त्या धोक्याचा इशारा मला–या राघुअण्णाला–प्रतिष्ठेनं मिरविणाऱ्या गांवच्या मालकाला द्यावा, या घटनेला म्हणायचं तरी काय? [ बाजीच्या खोलीकडे पाहात ] बाज्या, बाज्या, असला प्रसंग आणण्यापेक्षां लहानपणींच तूं मेला असतास तर...

**सगुणा:**–मामाजी, जर तरनं समाधान मानण्याची ही वेळ नाहीं. एक घाव दोन तुकडे करायचीच आपण आतां तयारी केली पाहिजे.

**राघुअण्णा:**–सगुणा, तूं तरी बोलव त्याला बाहेर.

**सगुणा:**–कशाला? काय करणार त्यांना बाहेर बोलावून?

**राघुअण्णा:**–त्याची कानउघाडणी केल्याशिवाय...

**सगुणा**:–पण कानउघाडणी करायला कान शाबूत नकोत का? आतां-पर्यंतच्या उपदेशानं त्यांच्या कानांच्या सताड खिडक्या झाल्यात. जाणिवेचा पडदा तुटून फुटून गेलाय. अशांत पुन्हां तसलंच कांहीं सांगणं म्हणजे सोसाट्याच्या वाऱ्यावर भुसकट उफणण्यासारखं होणार.

**राघुअण्णा**:–मी त्याच्याकडून शपथ घेईन.

**सगुणा**:–पण उपयोग काय तिचा? कुठल्या गोष्टीबद्दल त्यांना आदर किंवा पावित्र्य वाटतंय म्हणून शपथ पाळण्याची चाड वाटेल?

**राघुअण्णा**:–मग आतां करायचं तरी काय?

**सगुणा**:–मीच आतां ठरवीन तें. आजपर्यंत मी तुमच्यावर विसंबून स्वस्थ राहिलें. पण तुमचं हृदय पित्याचं आहे. मातापित्यांच्या आंधळ्या दृष्टीला पुत्राच्या दुर्गुणावर पांघरूण घालायचंच तेवढं समजतं. मग त्या पांघरुणाखालीं अग्नि धगधगत असो, प्रतिष्ठा जळून जावो किंवा घराण्याची राख व्हायची पाळी येवो–मला कळून चुकलंय, तुम्ही कधींही कठोर होणार नाहीं. आणि म्हणून मलाच आतां कंबर कसून तयार झालं पाहिजे. घरांतली पत्नीपदाची प्रतिष्ठा जाणून आजपर्यंत मी पतीपुढं तोंडांतून ब्र काढला नाहीं. पण आतां वेळ अशी आलीय कीं—

**राघुअण्णा**:–सगुणा, सूनबाई, तूं मनावर घेतलंस तर खरंच तो सुधारेल, ताळ्यावर येईल.

**सगुणा**:–ताळ्यावर येण्याची गोष्टच सोडून द्या आतां. तिची शक्यता मला तिळभरही वाटत नाहीं. पण त्यांच्या ताळ्यावर येण्यासाठीं नाहीं तरी गांवांतल्या आपल्या इभ्रतीसाठीं, घराण्याच्या मोठेपणासाठीं आणि वंशाच्या निर्मलतेसाठीं आतां कांहीं तरी करायलाच पाहिजे. मामाजी, आजपर्यंत त्यांचा हा नादानपणा घराबाहेर चालत होता तोंपर्यंत ठीक होतं. पण आज प्रत्यक्ष घरांत त्यांनीं त्या बाईला धरली होती. ती किंचाळत होती; अन् त्याच वेळीं आपला बाळ, माझा शिवाजी उठून येथें आला. मी चटकन् त्याचे डोळे झांकले. असलीं दृश्यं जर त्याला आतांपासून दिसूं लागलीं तर दुर्गुणी

पतीची पत्नी म्हणून माझ्या नांवाला लागलेला कलंक दुर्वर्तनी पुत्राची माता म्हणून कायमचाच माझ्या माथ्यावर बसेल! नाहीं, नाहीं; [ त्वेषानं ] हा अवास्तव कलंक मी सहन करणार नाहीं. त्याचप्रमाणें संस्कृतीनं, पावित्र्यानं आणि प्रतिष्ठेनं पुनीत झालेल्या माझ्या या घराची विटंबनाही मी होऊं देणार नाहीं. मग त्यासाठीं वाटेल तें दिव्य करायची पाळी आली तरी त्याला मी तयार राहीन.

**राघुअण्णाः**—कर. पोरी, कांहींही कर. तडा गेलेला घराण्याचा मान आणि मोठेपणा आतां शाबूत राहायचा झाला तर तो तुझ्याच हातून राहील. पण तो कसा हेंच मला कळत नाहीं. प्रत्यक्ष त्याचा पिता—मी जिथं त्याला ताळ्यावर आणायला दुबळा ठरलों, तिथं तूं त्याची पत्नी—एक अबला काय करूं शकणार?

**सगुणाः**—पत्नी ही घराबाहेर अबला ठरत असली तरी घरच्या साम्राज्यांत ती सम्राटासारखी सामर्थ्यवान असते. पतिव्रता स्त्री ही न्यायापुढें, नीतीपुढें आणि सत्यापुढें दुबळी गाय असली तरी अन्यायापुढं आणि अनीतीपुढं ती जिवंत आग होते. मग त्या आगींत ती स्वतःच्या पतीलाही भाजून काढायला भीत नाहीं!

**राघुअण्णाः**—[ घाबरून ] काय बोलतेस सगुणा? म्हणजे तूं करणार तरी काय? सांग, खरंच काय करणार?

**सगुणाः**—काय करणार तें आतांच काय सांगूं? पण जें करीन तें भयंकर असलं तरी न्यायाचं असेल; आणि तुम्हांला सांगितल्याशिवाय मी कांहींही करणार नाहीं हें ध्यानांत ठेवा. जा, तुम्ही आतां झोंपा जा. आतां ते बाहेर येणार नाहींत. उद्यां सकाळींच पाहूं.

**राघुअण्णाः**—जातों मी. [ वर जात ] पण त्याचेकडे लक्ष ठेव. त्याला आतां बाहेर जाऊं देऊं नकोस. [ जातात. सगुणा एकटीच कांहीं वेळ उभी राहते. मग बाजीरावच्या खोलीला बाहेरून कडी लावून ती आंत जाते. क्षणभर शांतता. लगेच बाजीराव आंतली कडी काढून दार उघडूं लागतो. पण बाहेरून कडी असते. तो सगुणेस हांक मारतो. सगुणा येते. ]

**सगुणाः**–काय झालं ओरडायला ? मामाजींनीं कडी घातलीय. तुम्हांला आतां बाहेर जातां येणार नाहीं.

**बाजीरावः**–[ आंतून ] अग, पण मला तहान लागलीय फार. पाणी हवं मला. कडी काढ. [ ती कडी काढते. तो बाहेर येतो. ती विचारते—]

**सगुणाः**–पाणी आणतें मी.

**बाजीरावः**–तहान फारच लागलीय मला. पण ती त्या तुझ्या स्वयंपाकघरांतल्या गार पाण्याची नाहीं. [ कपाटाकडे जातो. तें उघडून त्यांतली दारूची बाटली व ग्लास घेऊन येतो. ] हें बघ माझं पाणी. [ पिऊं लागतो. ती रागानें त्याचेकडे पाहात राहते. ]

**बाजीरावः**–काय ग, काय म्हणत होते अण्णा ?

**सगुणाः**–त्यांनाच विचारा कीं ! बोलावूं का त्यांना खालीं ?

**बाजीरावः**–बोलवायला कांहीं हरकत नाहीं. पण कशाला उगीच आतां म्हाताऱ्या माणसाची झोंपमोड करतेस ? तूंच सांग कीं, ते काय म्हणत होते तें !

**सगुणाः**–तुमचं अभिनंदन करीत होते ते !

**बाजीरावः**–ऑं ? खरं म्हणतेस कीं काय ? बाकी करणारच म्हणा ते ! कुठल्या बापाला आपल्या पुत्राचा अभिमान वाटणार नाहीं ?

**सगुणाः**–फार मोठा अभिमान वाटतोय त्यांना. सगळ्या गांवाचे शिव्याशाप ऐकतांना त्यांचा ऊर अगदीं अभिमानानं भरून येतोय आणि आज एका तमासवाल्याच्या तोंडून उपदेश ऐकतांना तर...

**बाजीरावः**–कोण तमासवाला ? तो गंग्या ? तो काय बोलला कीं काय अण्णांना ? तसं असेल तर भडव्याची जीभच उपटून काढीन.

**सगुणाः**–तो तसं कांहीं बोलला नाहीं. तसलं कांहीं बोलायच्या भानगडींत तो बिचारा कशाला पडेल ? फक्त त्यानं आपलं एक भाकीत सांगितलं.

**बाजीरावः**–तें कोणतं ?

**सगुणाः**–लवकरच पश्चात्तापाची पाळी येईल एवढंच तो म्हणाला.

बाजीराव:–पण कुणाला, त्याला का मला ? कांहींतरी गैरसमज झालेला दिसतोय नक्कीच तुझा. अग, त्यानं तें आपलं भाकीत सांगितलं असेल. आजच त्याच्यावर ती पाळी येणार होती. पण तुमच्या अडथळयानं तो वांचला. आतां, आज नाहीं तरी उद्यां पश्चात्तापानं रडायची पाळी त्याच्यावर मी आणणारच.

सगुणा:–उद्यां तुम्ही त्याच्यावर ती रडायची पाळी आणाल. पण परवां तशीच पाळी तुमचं दैव तुमच्यावर आणील.

बाजीराव:–दुबळ्या माणसांना दैव सदाच रडवितं. पण पराक्रमी पुरुषाचं दैव त्याला रडवीत नाहीं; तें त्याच्या सदैव मुठींत राहातं.

सगुणा:–कसला पराक्रम करताय तुम्ही ? गांवानं तुमच्या नांवानं खडे फोडायचे आणि तें ऐकून तुमच्या घरच्या माणसांनीं माना खालीं घालायच्या हाच ना ?

बाजीराव:–आलीस तूं मूळ पदावर ! यापुढं तूं काय बोलणार तें सगळं मला पाठ झालंय. म्हणून तें ऐकायला मी आतां थांबत नाहीं. [ उठून चालूं लागतो. ]

सगुणा:–कुठं निघालाय तुम्ही आतां ?

बाजीराव:–बकुळेच्या गाण्याला आणि हें बघ, दिनकर अजून आला नाहीं. तो आला तर त्याला मीं बैठकीकडे बोलावलंय म्हणून सांग. [ जातो. ती त्याला आरडून ओरडून परतवण्याचा प्रयत्न करते–तो तुच्छतेनं चालूं लागतो. ती अस्वस्थ होते. कांहीं वेळानं–]

सगुणा:–

## पद्य नं. १

अघटित आज बाइ घडलें
गंगाजीवन पापी ठरलें
पतिव्रतेच्या तेजापुढतीं
थोरथोरही शिरें नमावितीं

लाजुनि रविही शीतल झाला—
वैभव अजि तें नमलें
अनसूयेच्या सत्त्व-पालनीं
तिन्ही देवही लोळति चरणीं
पतिसेवेचें महात्म्य मंगल—
माझ्या रूपें हरलें
सावित्रीचें व्रत आचरिलें
सीतेपरि मी पाक राहिलें
अग्निप्रवेशीं आज कसें मम—
सतिपण लज्जित झालें ? ॥

[ गाणें संपल्यावर ती आंत जायला वळते. तोंच बाहेरून दिनकर येतो. बाजीरावाचा परममित्र. त्याच्याचसारखा विलासी वेष. ]

**दिनकरः**—वहिनी, वहिनी, बाजीराव आहे ना घरीं ?

**सगुणाः**—[ परत वळून ] ते गेले आतांच बाहेर !

**दिनकरः**—पुन्हां बाहेर गेला का ? [ आरामशीर बसत ] मला वाटलं, आतां इतकं झाल्यावर तरी तो बाहेर पडणार नाहीं.

**सगुणाः**—जातीचे पाटील, गांवचे मालक आणि त्यांत तुमच्यासारख्यांची साथ असल्यावर त्यांना कशाची भीति वाटणार बरं ?

**दिनकरः**—छान ! म्हणजे शेवटीं आमच्यावर आणलंत ना ? पण वहिनी, त्याच्या वाह्यातपणाला आम्ही हो काय करणार ? जिथं राघुअण्णासारख्या आपल्या वडिलांचं किंवा तुमच्यासारख्या साध्वी पत्नीचंसुद्धां तो मानीत नाहीं, तिथं माझ्यासारख्या मित्राला तो काय जुमानणार ? बाकी दिवसेंदिवस तो जास्तीच वहावत चालला. आज सायंकाळीं मी त्याला किती काबूत ठेवण्याचा प्रयत्न केला. पण अखेर तो त्या मैनेच्या घरांत गेलाच म्हणे. तिला घेऊन तो इथं आला होता काय ?

**सगुणाः**—हो. अगदीं कहर झाला आतां !

**दिनकरः**—नाहीं तर काय? एकादी बाई राजरोस घरांत घेऊन येणं म्हणजे हें आहे तरी काय? पण तुम्ही हें उघड्या डोळयानं पाहाताय तरी कसं?

**सगुणाः**—नाहीं तर काय करणार? तुमच्या हिंदु धर्मांत आणि त्यांतही आमच्या या मोठ्या घराण्यांत पत्नी म्हणजे पायाची दासी ठरविलीय ना तुम्हीं? पाय असून तिनं चालायचं नाहीं, डोळे असून बघायचं नाहीं, अन् वाचा असून बोलायचं नाहीं! दुर्गुणी असला तरी पति तिनं देव मानायचा आणि आपल्या सतीत्वाची जपणूक करीत आंतल्या आंत जळायचं!

**दिनकरः**—हेंच चुकतं तुम्हा स्त्रियांचं! जुनींपुराणीं तत्त्वं उराशीं कवटाळून किंवा नाहीं त्या गोष्टीचा बडेजाव मनांत मांडून जगांत कोणालाच सुख मिळालं नाहीं—मिळणार नाहीं; आणि तुम्ही स्त्रिया सुखाची तर अपेक्षा करतां, पण मनांतल्या पुराण्या गोष्टी मात्र टाकायला तयार असत नाहीं. मग हें जमणार कसं? अहो, हल्लींच्या काळांत जें मिळेल तें पदरांत पाडून घ्यावं लागतं आणि जें मिळत नाहीं त्याच्यासाठीं नीति—अनीति सोडून धांवपळ करावी लागते. तरच कांहींतरी सुख मिळणार. नाहींतर आंतल्या आंत जळायचं अन् मरायचं हें ठरलेलंच आहे!

**सगुणाः**—नीति-अनीति सोडून मिळणारं सुख घेण्यापेक्षां आंतल्या आंत जळून मरणंच जास्त चांगलं नाहीं का?

**दिनकरः**—पण कां? मनुष्यजन्म का पुनःपुन्हां येणार आहे? आणि मी म्हणतों आपल्या धर्माप्रमाणें येणार असला तरी त्या जन्मांतल्या सुखाच्या अपेक्षेनं या जन्मांत, चालू जीवनांत दुःख भोगा हा कुठला न्याय? वहिनी, तुमच्याबद्दलच्या भीतीनं माझं मन घाबरत असलं तरी तें सदैव सहानुभूतीनं मात्र पाझरत असतं. आमचं म्हणा, बाजीरावाचं म्हणा, ठीक आहे. तो तर इतका भाग्यवान आहे कीं, हवी ती स्त्री हव्या त्या ठिकाणीं मिळविल्याशिवाय कधींच रहात नाहीं. आमचंही थोडंसं जमतं तसंच. पण तुमचं

काय? या चार भिंतीच्या कोंडखान्यांत तुम्ही कशा झुरत असाल हा विचार मनांत आला कीं माझं मन घायाळ होतं!

सगुणाः—दिनकर, नका, तुम्ही असलं कांहीं बोलूं नका! तसलं कांहीं मला ऐकायचं नाहीं.

दिनकरः—हा तुमचा मोठा शालीनपणा आहे. पण अहो, न बोलून का मनांतलं शल्य कधीं झांकलं जाईल? आणि मी म्हणतों, माझ्यासारख्या जवळच्या माणसाला तें बोलायची चोरी तरी कां? सरळच सांगतों, कीं कितीतरी दिवसांपासून तुम्हांला सल्ला देण्यासाठीं माझा जीव सारखा तळमळतोय!

सगुणाः—कसला सल्ला देणार तुम्ही मला?

दिनकरः—कसला नी काय? आतां उघड सांगणंच भाग आहे म्हणा! अहो, दुसरा कसला? फक्त तुमच्या सुखाचाच!

सगुणाः—पण मी दुःखी आहें असं सांगितलं कुणीं तुम्हांला?

दिनकरः—आतां मात्र कमाल झाली तुमची! अहो, तें सांगावं लागत नाहीं. तें आपोआप कळतं अन् म्हणूनच वहिनी, माझं पाऊल सरळ तुमच्याकडे वळतं.

सगुणाः—कशाला?

दिनकरः—तुम्हांला सुख द्यायला.

सगुणाः—[दरडावून] दिनकर, तुम्ही कुठं, कुणापुढं आणि काय बोलतां आहांत याची शुद्ध आहे का तुम्हाला?

दिनकरः—पूर्ण शुद्धीवर आहें मी! फक्त तुम्हीच बडेजावाच्या गुंगींतून सावध होण्याची वाट पाहातोंय! माझ्या परममित्राच्या वाड्यांत त्याच्या स्वरूपसुंदर पत्नीसमोर आणि प्रेमाची भाषा बोलतोंय मी! ती तुम्हांला कळतेय. पण बडेजावाच्या गुंगीमुळें तुम्ही तिला साथ देत नाहीं. वहिनी,

त्या गुंगींतून लवकर सावध व्हा नाहींतर थांबा, मीच तुमचे डोळे चोळून तुम्हांला सावध करतों. [ उठतो. पण पुढं जायचा धीर होत नाहीं. थबकतो. ]

**सगुणा:**–अजुनी शुद्धीवर या. घाणींत लोळायचं सुख गटारांत मिळेल. पण सिंहासनापुढं घाणीची अपेक्षा मूर्खपणाचीच ठरेल !

**दिनकर:**–सिंहासन, ह्यॅः ह्यॅ [ खो खो हंसतो. ] हें सिंहासन असेल, पण तें बदफैलीपणानं पूर्णपणें पोखरून गेलंय, किडलंय !

**सगुणा:**–काय बोलतांय हें ? दिनकर, चालते व्हा ! स्वतःला त्यांचे परम-मित्र म्हणवून असं बोलतांना तुम्हांला शरम वाटली पाहिजे.

**दिनकर:**–शरम कां ? मला तर मोठा अभिमान वाटतोय. कारण तो माझा परममित्र आहे म्हणून तर मी असा वेळीं अवेळीं या वाड्यांत अगदीं तुमच्या एकांतांत येऊं शकतोंय ! आणि मी कांहीं इतका अधीर होत नाहीं. आज नाहीं उद्यां जरी...

**सगुणा:**–[ कठोर आवाजांत ] पेकाटांत लाथ बसून कुत्र्यासारखं केंकाटत जाण्याची इच्छा सफळ होईल !

**दिनकर:**–[ जवळ जात ] वहिनी, सगुणे ! माझं प्रेम आहे तुझ्यावर ! प्रेमासाठीं लाथ खाण्यांत दूषण नसून भूषण मानणारा मी वीर आहें. मग तें भूषण तुझ्याकडून मिळणार असेल तर त्याला विलंब कां ? [ हात धरतो. ]

**सगुणा:**–[ हात झिडकारून ] नादान माणसा—[ काड्कन मुस्काटांत देते व दूर ढकलून ] चालता हो बाहेर ! मामाजी, मामाजी, तुमची बंदूक घेऊन खालीं धांवा.

**दिनकर:**–कशाला त्या थेरड्याला उठवतेस ? मी जातों. [ बाहेर जात ] पण लक्षांत ठेव. जोंपर्यंत तुझा बदफैली नवरा माझ्या मुठींत आहे तोंपर्यंत ज्या हातानं आज माझ्या गालावर ही निशाणी केलीस तोच हात याच घरांत बळजबरीनं ताब्यांत घेतल्याशिवाय मी रहाणार नाहीं. [ दिनकरचं शेवटचं वाक्य संपतांना सगुणा पुन्हां त्वेषानं कोपऱ्यांतली काठी घेऊन त्याच्या

पायावर हाणते. तो एकदम बाहेर सटकतो. जातो. वरून राघुअण्णा येतात. त्यांच्या हातांत बंदूक. रागानं ते घराबाहेर बघतात. कुणीच दिसत नाहीं. मग ते सुनेकडे प्रश्नार्थक मुद्रेनं प्रथम पाहातात आणि मग—]

**राघुअण्णा:**—काय झालं सूनबाई ?

**सगुणा:**—एक जनावर आलंवतं, दोन पायाचं ! तुमच्या सुपुत्रानं खाय-प्यायला घालून नादान केलेलं. त्याला गोळी घालायची होती. पण तें पळालं !

[ राघुअण्णा दिङ्मूढ अवस्थेंत उभे असतात. पडदा पडतो. ]



# दुसरा अंक

## [ दुसऱ्या दिवशीं सकाळीं ८॥ वाजतां. ]

[ बाजीरावचा प्रशस्त श्रीमंती दिवाणखाना. सगुणा ६।७ वयाच्या शिवाजीचा हात धरून त्याला आंत स्वयंपाकघरांत सकाळचा खाना खायला चलण्याचा आग्रह करीत असते. तो आढेओढे घेतो. ती त्याला कुरवाळते, मुके घेते अन् परत आग्रह करते— ]

**सगुणाः**—असा रे काय करतोस? चल ना बाळ, मी माझ्या हातानं तुला भरवितें. साखर घालतें. तूपही तुझ्या हातानं घे. मग तरी झालं ना? चल.

**शिवाजीः**—[ मान हलवीत ] अं हं. मी नाहीं येणार आंत. मला इथं आण खायला!

**सगुणाः**—असा हट्टी आहेस! एक हेका म्हणजे एकच. आपलंच चालवायचा हेका तुमच्या रक्तांतच भिनलाय जणू. थांब, आणतें हं इथंच. [ आंत जाते. शिवाजी तिथंच इकडे तिकडे पाहात उभा राहातो. सगुणा

चांदीच्या फुलपात्रांतून पाणी आणि ताटलींतून शिरा घेऊन येते. ] हं, बस बघूं इथं. [ तो खालीं बसतो. ] हं, घे.

शिवाजीः–[ घांस न घेतां ] आम्ही नाहीं जा. आम्हांला अगोदर सांग–

सगुणाः–काय ?

शिवाजीः–बाबा कुठं गेले ?

सगुणाः–हा घांस घे अगोदर. मग सांगतें.

शिवाजीः–[ घांस घेऊन ] हं, सांग आतां.

सगुणाः–ते बाहेर गेलेत. आज तुला ते पाटी पुस्तक आणणार आहेत. मग आमचा राजा शाळेंत जाणार ! जाणार ना ?

शिवाजीः–आणि ती बाई गेली का ?

सगुणाः–कुठली ?

शिवाजीः–[ बोटानें दाखवीत ] इथंच. इथंच रात्रीं होती बघ. कोण होती ती ?

सगुणाः–[ त्वेषानं बाजूला पाहात ] ती त्यांची आई होती.

शिवाजीः–छाट् ! आई अशी लहान असते होय ? बाबा किती मोठे ! ती लहान होती. चांगली होती.

सगुणाः–अरे, चुकलंच आपलं. ती त्यांची मुलगी होती.

शिवाजीः–मग तिला त्यांनीं धरलीवती कशाला ?

सगुणाः–अरे, मी नाहीं का तुला असं धरून कुरवाळतें, असे मुके घेतें, तसंच करीत होते ते !

शिवाजीः–मग ती ओरडत कां होती ?

सगुणाः–अरे, तुझ्या गालाला काय लागलंय तें ? इश्श, खरकटं लागलं ग बाई !

शिवाजीः–कुठं ? इथं ? [ बोट ठेवून ]

सगुणाः–अं हं ! जरा वर.

**शिवाजीः**—इथं ? इथं ? मग पूस ना तूं.

**सगुणाः**—पुसतें हं [ मुका घेत—] गेलं बघ निघून.

**शिवाजीः**—हं, सांग आतां. ती बाई कां ओरडत होती ?

**सगुणाः**—हें बघ; ते आले म्हणजे आपण त्यांनाच विचारूं. आतां येतील ते. तोंपर्यंत तूं तयार हो बघूं खाऊन. हं, खा भरभर. [ वरून राघुअण्णा येतात. उपरणें अंगावर टाकून आणि हातांत काठी घेऊन बाहेर जाण्याच्या तयारींत. शिवाजीचें खाणें संपलेलें असतें. त्यांना पाहातांच तो त्यांचेकडे धांवतो. त्यांना बिलगून तो उपरणें, काठी मागतो. ]

**शिवाजीः**—आजोबा, आजोबा, मी येणार तुमच्याबरोबर. मला उपरणें द्या, काठी द्या !

**राघुअण्णाः**—हें बघ, माझ्यासारख्या मिशा आहेत का तुला ? मिशा असल्या तरच उपरणं काठी घ्यायची !

**शिवाजीः**—मग मिशाही द्या !

**सगुणाः**—खुळारे खुळा ! अरे त्यांच्यासारखा मोठा हो, शहाणा हो अन् मग उपरणं काठी घेऊन गांवांतून मिरव. आतांच त्या वस्तू तूं घ्यायच्या नाहींत. हें बघ, ही टोपी घालायची आणि तूं खेळायला जायचं. [ टोपी घेऊन त्याला घालते. राघुअण्णा त्याला कुरवाळत बोलतात— ]

**राघुअण्णाः**—कसा शहाणा आहे बघ ! आतां आमचा शिवा शाळेंत जाणार. शहाणा होणार आणि आई सांगेल तसं ऐकणार. खरं ना राजा ? जा, आतां पळा. [ तो बाहेर पळत जातो. ]

**सगुणाः**—[ सुस्कारा सोडून ] हं ! सांगेल तसं ऐकणार. तीच मला मोठी काळजी वाटतेय. लहान मुलं अनुकरणशील असतात. सांगितलेलं त्यांना समजत नाहीं. पण पाहिलेलं मात्र बरोबर करण्याकडे त्यांची वृत्ति होते. आतांच पहा. रात्रीं त्यानं ओझरतं पाहिलं होतं. पण तें दृश्य बरोबर त्याच्या मनावर ठसलंय. त्याबद्दलच तो पुनःपुन्हां विचारीत होता,

ती बाई कोण ? आणि त्यांनीं तिला कां धरली होती ? मामाजी, असलीं दृश्यं आतांपासून आपल्या या कुलदीपकाच्या मनावर ठसूं लागलीं तर...

राघुअण्णा:–त्याचा परिणाम भयंकर वाईट होईल हें खरं आहे, आणि म्हणूनच तुला त्यासाठीं डोळ्यांत तेल घालून सावध राहिलं पाहिजे.

सगुणा:–पण कशी सावधगिरी घ्यावी तेंच कळत नाहीं. जळती आग सभोंवतीं भडकल्यावर तिची ऊब लागणार नाहीं असं होईल तरी कसं ? म्हणून म्हणतें, यावर उपाय एकच आहे.

राघुअण्णा:–तो कोणता ?

सगुणा:–ती आग विझवून टाकण्याचा.

राघुअण्णा:–पण कशी ?

सगुणा:–गेल्या सालींच याबाबत मी तुम्हांला बोललें होतें. त्यांनीं त्या सगन सोनाराला त्याच्या बायकोच्या पायांत खतम केला त्यावेळीं बघा; पुराव्यासकट ते आणि त्यांची चांडाळ चौकडी बरोबर अडकत होती. पण त्यावेळीं तुमचं पुत्रप्रेम उचंबळून आलं. तुम्ही पाण्यासारखा पैसा ओतला, सरकारदरबारीं असलेलं आपलं वजन खर्च केलं आणि त्यांना त्यांच्या नादान मित्रासकट सोडवून घेतलं. बिचारा सोनार मातीला मिळाला, त्याची बायको देशोधडीं लागली आणि त्याचं घर खलास झालं. पण एवढं ज्यांनीं केलं ते मात्र तशाच गोष्टी पुन्हां करायला गांवांतून राजरोस फिरूं लागले. मामाजी, त्यावेळीं त्यांना वांचवून काय मिळविलं तुम्हीं ? एकादा मोठा तडाखा बसल्याशिवाय अशा लेकांचे डोळे उघडत नाहींत. त्याच वेळीं हे दहावीस वर्षं खडी फोडायला गेले असते तर...

राघुअण्णा:–फार बरं झालं असतं. पण त्यावेळीं मीं त्याला वांचविला तें पुत्रप्रेमाच्या उमाळ्यानं नाहीं. तर घराण्याच्या अभिमानासाठीं. पिढ्यान्-पिढ्या चालत आलेला मोठेपणाचा लौकिक ढांसळूं नये आणि घराण्यांतला एक कर्ता पुरुष खुनाचे पायीं तुरुंगांत गेला असा आपल्या कुळाला काळिमा लागूं नये म्हणून.

**सगुणा**:–कायद्याच्या दृष्टीनं तुम्हीं कुळाचा काळिमा पुसून काढला. पण जगाच्या दृष्टीपुढून तो कसा नाहींसा होणार? चांगल्या गोष्टी लोक लवकर विसरतात; पण असल्या कलंकित गोष्टी त्यांच्या मनावर वज्रलेप होतात; आणि त्यानंतर त्यांनीं या वर्षांत केलेले पराक्रम—मामाजी, तुम्ही त्यावेळीं त्यांना एका आरोपांतून वांचविलं नाहीं तर तसेच अनेक गुन्हे करायला तुम्हीं त्यांना उत्तेजन दिलं! सांगा, या वर्षांत तुमच्या घराण्याचा मोठेपणा कितीसा वाढला? कुळाचा लौकिक कितीसा चढला?

**राघुअण्णा**:–[ विपण्ण वृत्तीनं ] फार फार चढला! घराबाहेर पडलं कीं तो लोकांच्या तोंडून तिन्ही त्रिकाळ ऐकायला मिळतो; म्हणून मी आतांशा घराबाहेर पडायचं देखील सोडून दिलंय. गांवचा मालक मी. केवढा दरारा माझा गांवांत. माझ्या विचाराशिवाय गांवचं पान हलत नव्हतं. कुणाचं पाऊल जरा चळलं तर मग तो लहान असो मोठा असो, हातांतली ही काठी उगारून मी त्याला अद्दल घडवीत होतों. पण आतां एकादा फडतूस माणूससुद्धां माझ्या डोळयांदेखत दुर्वर्तन करूं लागला तरी माझी ही काठी तर राहोच, पण माझी जीभसुद्धां उचलली जाणार नाहीं; आणि याचं कारण बाजी, त्याचं वर्तन! या पोराला वांचवून मीं घराण्याचा कलंक पुसून टाकला, का स्वतःच्या हातानं स्वतःच्या तोंडाला काळोखी फांसली तेंच कळत नाहीं मला.

**सगुणा**:–असं बोलूं नका मामाजी. तसं म्हणायला कुणीच धजणार नाहीं. कुणाचीही जीभ हलणार नाहीं. कारण, तुमचे हात पवित्र आहेत. त्यांच्या स्पर्शानं लाकडाला पालवी फुटेल, दगडांना पाझर सुटेल आणि मातीचं देखील सोनं होईल– नव्हे तसं तें कित्येकदां झालंय. पण त्यांची कृति मात्र—

**राघुअण्णा**:–सगळयांच्या तोंडाला काळोखी फांसणारी आहे. पण एवढ्या माझ्या पवित्र हातांत किंवा वाणींत त्याची कृति सुधारायचं सामर्थ्य कां नसावं? अन् जर तें नसेल तर मग त्या पवित्रतेला कांहीं अर्थ आहे

का? मी आज तिचा प्रत्ययच बघणार. किंबहुना मीं आज निश्चयच केलाय. तो आपल्या दुष्कृत्यापासून परावृत्त झाला तर बरं—नाहीं तर त्याच्यापुढं डोकं आपटून मी जीव देणार!

सगुणाः—तसा प्रयत्न करा. पण निश्चय करूं नका. प्रयत्नाला फळ मिळालं तर सोन्याहून पिवळं होईल. पण तुम्हीं निश्चय केला तर त्यांत मला भयंकर अशी भीतीच वाटते. कारण, तुमचा निश्चय म्हणजे जशी भीष्मप्रतिज्ञा, त्याचप्रमाणें त्यांचा दुष्कृत्यांचा हेका म्हणजेही एक भीष्मप्रतिज्ञाच असते. असली प्रतिज्ञा चांगल्या कारणीं लागली तर माणसाला देवपणा प्राप्त होतो, पण ती वाईट कामाकडे वळली तर माणसाला पशु बनविते. त्यांची प्रतिज्ञा या दुसऱ्या प्रकारची आहे. मला तर फार मोठी भीति वाटतेय, कीं त्या बिचाऱ्या गंगाराम—मैनाच्या संसाराचा विध्वंस हे आज ना उद्यां करणारच.

राघुअण्णाः—शक्य नाहीं. मीं गंगारामला तसं वचन दिलंय. तो त्यांच्याकडे पुन्हां वळल्याचं जर माझ्या कानावर आलं तर मी माझ्या हातानं त्याला गोळी घालीन.

सगुणाः—[ घाबरून ] मामाजी!

राघुअण्णाः—कां, घाबरलीस? सूनबाई, पित्याचं अंतःकरण नुसतं मायाळूच असत नाहीं; तर तें कर्तव्यकठोरही असतं हेंच मी तुला दाखवीन.

सगुणाः—पण उशीरां जागी झालेली तुमची कर्तव्यकठोरता आणि त्यांचा हेका यांचा मेळ बसायचा कसा? मला तर तें फार कठीण दिसतंय आणि म्हणूनच मी तुम्हांला बोललें कीं तसा प्रयत्न करा; प्रतिज्ञा करूं नका.

राघुअण्णाः—प्रयत्नानं तो ताळ्यावर येण्यासारखी परिस्थिति आतां राहिली नाहीं. काय वाटेल तें होवो. शेंडी तुटो नाहीं तर पारंबी तुटो; पण त्याच्याबाबत प्रतिज्ञा करण्यावांचून आतां दुसरा मार्गच नाहीं.

सगुणाः—तुमच्या करारी प्रतिज्ञेपुढें तें नमतील असं वाटतं. पण त्याचबरोबर हीही भीति वाटते, कीं जसा तुमचा करार तसाच त्यांचाही पक्का

हेका असतो. अमुक एक गोष्ट करायची असं त्यांनीं ठरविलं कीं ती केल्याशिवाय ते आजपर्यंत कधींही राहिले नाहींत. म्हणून मला अधिक भीति वाटते. रात्रींच पहा, तुमच्यासमोर ते नरमले. त्यांनीं मैनेला लगेच सोडली. पण तुम्ही वर जाऊन झोंपल्याबरोबर ते बाहेर आले आणि दारू पिऊन बडबडूं लागले, कीं 'मैना आज सुटली ती तुमच्या आड पडण्यानं. पण तिला मी सोडणार नाहीं. आज ना उद्यां तिला मी ताब्यांत घेणारच.'

राघुअण्णाः—असं बोलला तो रात्रीं ?

सगुणाः—होय. अन् बोलले एवढंच नव्हे तर तसं बडबडतच ते बाहेर पडले.

राघुअण्णाः—म्हणजे रात्रीं लगेच तो पुन्हां बाहेर पडला ? मग मला कां तूं बोलावलं नाहींस ?

सगुणाः—बोलावलं होतं कीं !

राघुअण्णाः—तें बंदूक घेऊन या म्हणून ओरडलीस तें होय ? छान ! म्हणजे काय त्याला गोळी घालायचा तुझा विचार होता कीं काय ?

सगुणाः—अगोदर होता. पण नंतर पालटला म्हणूनच मीं तुम्हांला कांहीं सांगितलं नाहीं. [बाजीराव बाहेरून येतो अन् आल्याआल्याच निरोप सांगतो.]

बाजीरावः—अण्णा, अण्णा ! आज ते कोण अबकारी मंत्री येणार होते ना, त्यांची मोटार आलीय आतांच चावडीवर. सगळे लोक जमलेत अन् तुम्हांला तावडतोब बोलावलंय !

राघुअण्णाः—मग तूं कां गेला नाहींस ? असल्या गोष्टी आतां तूं हळू-हळू बघायला पाहिजेस. जा, तूंच जा आज.

बाजीरावः—अं हं, मी नाहीं. जा आपले तुम्हीच.

राघुअण्णाः—कां, तुझ्या तोंडाला काय दारूचा वासबिस येतोय कीं काय ?

बाजीरावः—छे, तसं कांहीं नाहीं. पण...

सगुणाः—तोंड उजळ नको का मोठ्या माणसापुढं जायला ?

**बाजीराव:**—नसेल माझं तोंड उजळ. मी अगदीं तोंडाला काळोखी फांसूनच फिरतोंय. पण तुझं तोंड मात्र अगदीं उजळ आहे हं. सगळं गांव सती म्हणून तुझी महती गातंय. पण हीच सती पतीला बोलतांना मात्र सैतान होत असते हें कुणालाच दिसत नाहीं!

**राघुअण्णा:**—पण तिला बोलायला संधि तुझ्याकडूनच मिळत नाहीं का?

**बाजीराव:**—हां, तें मात्र चुकलंय माझं. आपल्या साध्वी पत्नीचा मान ठेवण्यासाठीं मीं जरा नरमाईचं धोरण स्वीकारलं, त्यामुळंच ही अशी शिरजोर बनली.

**सगुणा:**—काय शिरजोरपणा केला मीं?

**बाजीराव:**—हाच; अद्वातद्वा बोलण्याचा. [ अण्णांकडे पाहून करुणतेनं ] परवां माझ्या मित्रासमोर ही माझ्यावर उखडली. त्यानं तें गांवभर केलं. चार लोकांत मान खालीं घालायची पाळी आली माझ्यावर. अंगाचा तीळ-पापड झाला माझ्या. त्याच वेळीं मी तावातावानं घरीं आलों. पण तुमच्या भीतीनं गप्प बसलों. तुम्हांला तिचे गुण फक्त दिसतात. पण हे असले अवगुण?

**राघुअण्णा:**—सतीनं पतीला विरोध करणं हा अवगुण ठरेल. पण जर पती गुणाचा पुतळा असेल तरच. नसेल तर...

**बाजीराव:**—तिनं पतीला खेटरानं मारावं असंच ना? अण्णा, तुम्हीच असं बोलल्यावर...तुम्हांला आठवतं मी अगदीं लहान होतों तेव्हां. एकदां जेवतांना एका क्षुल्लक गोष्टीबद्दल आईनं तुमच्यापुढं एकच विरोधाचा शब्द उच्चारला. तिथल्या तिथं तुम्हीं पाण्याचा भरलेला तांब्या तिच्या तोंडावर फेकून मारला. तिच्या कपाळाला खोंक पडली. तोंड रक्तबंबाळ झालं. मरेपर्यंत तिच्या कपाळावर तो वण राहिला अन् पुन्हां तिच्या तोंडून चुकूनही कधीं विरोधाचा शब्द तुमच्यापुढं निघाला नाहीं. पतीचा मान ठेवणारी आपल्या घराण्यांतली ती स्त्री आणि ही—

**राघुअण्णा:**—तीही तसाच तुझा मान ठेवील. पण त्यासाठीं तुला आपलं वर्तन पायाशुद्ध ठेविलं पाहिजे.

**बाजीराव**:–हं, तेंच अगोदर सांगा. मीच चुकतोंय. मी शेण खातोंय. [ वर जाण्यासाठीं वळत ] मी गाढव आहें, मूर्ख आहें. ज्यानं उठायचं त्यानं माझ्या नांवावर कोरडे ओढायचे. एकदां कानफाट्या नांव पडलं कीं...म्हणा कांहींही ! तें मला सहन केलंच पाहिजे. [ जिन्यावर दोन पायऱ्या चढतो. ]

**राघुअण्णा**:–[ दरडावून ] बाजी, मागं फीर. असा तोंड दडवून जाऊं नकोस. मला तुझा जाब पाहिजे.

**बाजीराव**:–[ पुन्हां एक पायरी चढत ] तुम्ही चावडीकडे जाऊन या, अण्णा. मग आपण बोलूं.

**राघुअण्णा**:–झक् मारली ती चावडी. घराला लागलेली आग मला अगोदर विझवूं दे. बाजी, बाज्या, खालीं ये.

**बाजीराव**:–[ तिरीमिरीनें खालीं येत ] हें घ्या आलों. मारून टाका मला. त्याशिवाय तुमचं समाधान व्हायचं नाहीं.

**राघुअण्णा**:–वेळ आली तर तेंही करीन. पण मला हें सांग अगोदर, रात्रीं मैनेला इथं कशाला आणली होतीस ?

**बाजीराव**:–मीं आणली नव्हती. तीच आली.

**राघुअण्णा**:–म्हणजे ? तूं तिच्या घरीं गेला नव्हतास ?

**बाजीराव**:–गेलों होतों.

**राघुअण्णा**:–कशाला ?

**बाजीराव**:–तिचं गाणं ऐकायला.

**राघुअण्णा**:-मग तिथं गाणं न ऐकतां दोघं इथं कशाला आलां तडफडत ?

**बाजीराव**:–तिथं गंगारामनं विरोध केला. तो तिला अन् मलाही अद्वा-तद्वा बोलला. मला तें सहन झालं नाहीं. मीं त्याला दोन ठोसे देऊन रागानं उठून आलों. मैना माझी समजूत करायला माझ्यामागं आली.

**राघुअण्णा**:–आपल्या पायानं चालत आली ती ?

**बाजीराव**:–मग काय, मीं तिला मोटार पाठविली होती ?

राघुअण्णाः—तूं उचलून आणली नाहींस तिला ?

बाजीरावः—[ नवलानें ] तिला ? अन् मी उचलून आणणार ? एका नाचणाऱ्या बाईला ? तिच्यासारख्या पन्नास बाया आपल्या पायानं माझ्यामागं येतील कीं !

राघुअण्णाः—अगदीं खोटं. साफ खोटं सांगतोयूस तूं !

बाजीरावः—हें खोटं वाटणारच तुम्हांला. कारण तें मी सांगतोंय ना ? त्यावर कसा विश्वास बसणार ? तुमचा विश्वास त्या तमासवाल्यावर, त्या नाचणारणीवर अन् नवऱ्याला विरोध करणाऱ्या तुमच्या या लाडक्या सुनेवर—

राघुअण्णाः—बाज्या, उगीच कांगावा करूं नकोस. खरं सांग, तूं तिला ओढून आणलं नाहींस ?

बाजीरावः—नाहीं.

राघुअण्णाः—ठीक. तें मी खरं समजतों. पण यापुढं लक्षांत ठेव. तिच्या घरीं तूं जायचं नाहीं अन् तिलाही या घरीं कधीं आणायची नाहीं !

बाजीरावः—तिला घरीं आणायचं नाहीं हें कबूल. पण तिच्या घरीं जायला कां बंदी ? सगळ्या गांवाला जिचं गाणं ऐकायला मिळतंय तें ऐकायची मला कां बंदी असावी ?

राघुअण्णाः—शंभर म्हणतां दोनशें रुपये दे. तिची बैटक पारावर घे अन् खुशाल तिचं गाणं ऐक कीं ! त्याला कोण अटकाव करतंय ?

बाजीरावः—पण अण्णा, तुमच्याजवळ खोटं बोलायचं मला जन्मांत कधीं ठाऊक नाहीं. म्हणून खरं तें सांगतों, फक्त आजचा दिवस मी तुम्हांला विनंति करतों. गंगारामनं केलेल्या माझ्या अपमानाबद्दल मीं एक प्रतिज्ञा केलीय कीं, तिच्या घरीं जाऊन तिचं गाणं ऐकायचं. बरं, मी कांहीं एकटा जाणार नाहीं. तिथं कांहीं कमीजास्तही करणार नाहीं. चार मित्रांसमवेत जाईन अन् फक्त तिची एक लावणी ऐकून लगेच बाहेर पडेन. पुन्हां मी तिचं नांव काढणार नाहीं. म्हणून म्हणतों फक्त आज, एकदांच तिच्या घरीं जायची मला आपण मोकळीक द्यावी.

सगुणाः—तसं मुळींच जातां येणार नाहीं.

बाजीरावः—तूं मध्यें बोलूं नकोस. अण्णा जसं सांगतील तसं मी वागणार आहें. त्यांचा शब्द मी मोडणार नाहीं.

राघुअण्णाः—बरं जा. फक्त आज एक दिवसच. त्यानंतर मात्र...

बाजीरावः—मुळींच जाणार नाहीं.

राघुअण्णाः—ठीक. बाजी, झालं तें गेलं. यापुढं तूं असा समजून वाग. मग कोण तुझ्या नांवाला बट्टा लावतंय तें मी पाहातों. गांव आहे अन् मग मी आहें. पण तुझं पाऊल घसरतां कामा नये. जातों, मी येतों चावडीवर जाऊन. [ जातात. ]

बाजीरावः—[ सगुणेस ] झालं तुझं समाधान ?

सगुणाः—कशानं ? त्यांना तुम्हीं फसविलं, चकविलं म्हणून ? सरळ स्वभाव त्यांचा. सगळं खोटं, पण सगळं खरं वाटलं त्यांना !

बाजीरावः—तुला तें खरं कसं वाटेल ? स्वभावाला औषध नाहीं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं.

सगुणाः—मला पक्कं ठाऊक आहे. तुम्ही आज मैनेच्या घरीं जाणार तें तिचं गाणं ऐकायला नाहीं.

बाजीरावः—तिला भ्रष्ट करायला जाणार आहें, ऐकलंस ? मग म्हणणं काय तुझं ?

सगुणाः—माझं म्हणणं पुष्कळ आहे. पण तें मी आतां बोलून दाखविणार नाहीं; करूनच दाखवीन.

बाजीरावः—अस्सं ! काय करणार तूं ?

सगुणाः—मी तुम्हांला जाऊं देणार नाहीं. तुमच्या आडवी पडेन.

बाजीरावः—फार चांगलं होईल. तुला तुडवून जाण्याचं भाग्य अद्याप कधींच लाभलं नाहीं मला. तें आज लाभेल !

सगुणाः—मग देईन तशी संधि मी आज तुम्हांला. तिनं तरी भाग्यवान ठरा. [ रागानें आंत जाते. बाजीराव खुषींत येतो. भकास आवाजांत

कुठल्या तरी सिनेमांत ऐकलेलं एक दर्दभरी गाणं आपल्या भेसूर आवाजांत म्हणतो. तें भेसूर गाणें संपवायलाच जणूं दिनकर प्रवेश करतो. ]

**दिनकर:**–बाजी, ये बाजीराव! अरे काय, झोपलायस कीं काय?

**बाजीराव:**–झोपतोय कसला बेट्या! मनाला शांतता असली तर झोंप येईल ना? रात्रीच्या त्या प्रकारापासून तर माझ्या मनांत नुसता अग्नी धगधगतोय!

**दिनकर:**–मग पाणी ओत कीं त्यावर जरा. आहे ना कांहीं आज? अरे, नाहीं तर राहूं दे. आज कुणी दारूचा मंत्री आणि पोलीस आले आहेत म्हणे आपल्या गांवांत!

**बाजीराव:**–अरे, चल! असली भीति एकाद्या मजुराला घालशील का मला? [ दारूची बाटली व ग्लास टेबलावर ठेवून ] आणि मी म्हणतों हे मंत्री, पोलीस जे फिरतात ते दारूबंदी करायला का दारू काढून प्यायचं, लोकांना उत्तेजन द्यायला?

**दिनकर:**–अरे, बोलतोय्स तरी काय? सरकारनं दारूबंदी केलीय बाबा.

**बाजीराव:**–माहीत आहे मला दारूबंदी. राजरोस दुकानांतून विकायची फक्त बंदी! दारू काढायला आणि प्यायला कांहीं त्यांना बंदी करतां येत नाहीं!

**दिनकर:**–बंदी नाहीं कशी? लोकांना दंड आणि शिक्षा होतायुत ना भडाडा?

**बाजीराव:**–किती लोकांना आणि कोणत्या लोकांना? एकादा गरीब सामान्य मजूर पकडायचा आणि द्यायची त्याला शिक्षा. तीही कां? तर आपण केलेल्या कायद्यांचा बरोबर अंमल होतोय हें दाखविण्यासाठीं. एरवीं सर्वांना मोकळीकच आहे. सामान्य लोकांच्या बैठकींत बसून पोलीस दारू पितात. आपल्यासारख्यांच्या बैठकींत सामील होऊन मंत्रीही तिचा आस्वाद खात्रीनं घेतील. [ भरलेल्या ग्लासाकडे बोट करून ] उचल तो ग्लास. अचानक आलेच मंत्रीसाहेब इथं तर देऊं त्यांनाही एक उंची ग्लास

भरून. काय ? अरे, दारूबंदी नव्हती तेव्हां जेवढी दारू तयार होत होती, त्याच्या कितीतरी पटीनं सध्यां दारू तयार होतेय आणि पूर्वी बोटावर मोजण्याइतकेच लोक पीत असतील, पण आतां पिणारांची गणतीच करतां येत नाहीं. अधिक धान्य पिकवा म्हणून नेहरूंचा आक्रोश चाललाय तिकडे, तर अधिक दारू कशी निर्माण करतां येईल हे लोक बघतायत इकडे.

**दिनकरः**—बाकी दारूबंदीसंबंधीं आपण वर्तमानपत्रांत पुष्कळ वाचतों. पण तशी अडचण आपणांला कधींच वाटली नाहीं, हें मात्र नवलच आहे नाहीं ?

**बाजीरावः**—नवल कसलं ? अरे, ती वाटूं नये ही तर दारूबंदीची मूळ योजना आहे. पूर्वी आपल्यावर ब्रिटिश सरकार राज्य करीत होतं. दीडशें वर्षे तें राज्य टिकलं तें त्यांच्या अनेक हिकमतींवर. चालू राज्य वाईट आहे असं लोकांना वाटूं नये, किंबहुना त्यांना त्यावर विचार करायला सवडच सांपडूं नये असे अनेक विषय तें सरकार लोकांना डोकीं घांसायला पुरवीत होतं. जातींचीं भांडणं, धर्मांचे प्रश्न आणि सामाजिक सुधारणा असल्या विषयांत लोकांचीं डोकीं अडकल्यावर राज्य उलथून टाकायचा विचार सुचणार तरी कुणाला ? त्या सरकारचा बरोबर कित्ता गिरवणारंच हें आपलं लोकशाही सरकार आहे. लोकशाही म्हणायची पण लोकांच्या हातांत काडीही नसायची. हवे तेच लोक निवडून आणायचे, पाहिजे तेंच मंत्रीमंडळ बनवायचं आणि हा बनाव लोकांचे ध्यानांत येऊं नये म्हणून ‘दारूबंदी’ या सोज्वळ नांवाखालीं त्यांना दारू काढायची अन् प्यायची भरपूर मोकळीक द्यायची ! आहे का नाहीं शक्कल ? असा प्रकार चालू राहिला तर दहावीस वर्षे त्यांचं आसन स्थिर राहील कीं नाहीं, बोल !

**दिनकरः**—ये, त्यांचं आसन स्थिर राहूं दे नाहीं तर तिकडं कोलमडून पडूं दे ! त्याच्याशीं आपणाला काय करायचंय ? मला आतां रात्रीचं सांग. इतकं आम्ही तुला साह्य करून तूं रात्रीं तिला सोडलीस कां ?

**बाजीरावः**—कारण, एक-घरचीं नादान माणसं ! दिन्या, माझ्या दोस्ता, मी सांगेन तें करायला तूं एका पायावर तयार. पण माझी बायको आणि

वडील—वडिलांचंही कांहीं विशेष नाहीं. पण बायकोच भयंकर आडवी पडतेय रे!

**दिनकरः**—पडायची, चालायचंच! किती केलं तरी बायकोचा विरोध असा करून करून करणार तरी काय?

**बाजीरावः**—खुळा आहेस! अरे बाबा, ती सामान्य बायको नाहीं. मंगळसूत्राच्या दोऱ्यानं माझ्या मस्तकावर बांधलेली टांगती तरवार आहे ती!

**दिनकरः**—अरे, बोलतोस काय? सगळं गांव तर तिला नांवाजतंय!

**बाजीरावः**—अकलेचा कांदाच दिसतोस लेका! गांवाच्या नांवाजण्यावरून का नवऱ्यानं बायकोला चांगली म्हणायची? शुद्ध वर्तनानं ती गांवाला चांगली दिसत असेल. पण तिचं शुद्ध वर्तन हाच माझ्या मार्गांतला मोठा खड्डा आहे. त्यांत ती मला केव्हां गाडील त्याचा नेम नाहीं!

**दिनकरः**—छान! चांगलं आहे कीं हें. आम्ही बाहेरच्यांनीं तुझ्या जिवाला जीव द्यायला तयार व्हायचं अन् घरच्यांनीं मात्र तुला विरोध करायचा! अरे, पण तूं वहिनीला एवढा भितोस कां?

**बाजीरावः**—भितोय कसला? भीत असतों तर काल मैनेला मी घरीं आणली असती का? पण असल्या गोष्टी करायला तिची मोठी अडगळ वाटते हें मात्र खरं.

**दिनकरः**—मग ती अडगळ दूर करावी.

**बाजीरावः**—पण ती कशी हाच प्रश्न आहे. रात्रीपासून मी या गोष्टीचा सारखा विचार करतोंय आणि अखेर एक भयंकर कल्पना आलीय माझ्या डोक्यांत—अरे, हात आखडलास काय? घे, उचल तो ग्लास. [दारू ओततो.]

**दिनकरः**—तुझी भयंकर कल्पना काय आहे ती सांग तरी एकदां. ती चित्त थाऱ्यावर आहे तोंवरच मला ऐकूं दे!

**बाजीरावः**—हें बघ, पतीला विरोध करणारी बायको हा आमच्या घराण्यांत मोठा काळिमा समजतात.

**दिनकरः**–अरे, पण वहिनी तर मोठी साध्वी अन् सती म्हणून नांवाजलेली आहे !

**बाजीरावः**–कसली सती ? जी पतीच्या प्रत्येक कृतीला साथ करते तीच खरी सती. तशी आहे का ती ? जरासुद्धां तिची मला साथ होत नाहीं. उलट पावलोपावलीं माझ्याशीं तीव्र विरोधच आरंभलाय तिनं. तुला कल्पना नाहीं. आमच्या पहिल्या आजीची गोष्ट सांगतात. आमचे आजोबा सही सही माझाच नमुना होते; किंवा मी त्यांचा आहें म्हण–आमची पहिली आजी अशीच हिच्यासारखी खाष्ट होती. उभ्या गांवांत आजोबांपुढं विरोधाचा एक शब्द काढणारा कुणीच मायेचा पूत नव्हता. पण आजीनं मात्र घरांत त्यांना सळो कीं पळो करून सोडलं होतं. मग आजोबांनीं काय केलं असेल बरं, सांग. काय तुझी कल्पना चालतेय ती तरी बघूं.

**दिनकरः**–त्यांनीं मारून किंवा उपदेश करून आजीला वठणीवर आणलं असेल !

**बाजीरावः**–छाट् ! उपदेश किंवा तडजोड या गोष्टी आमच्या रक्तांतच नाहींत. एकदम तड् कीं फड् ! त्यांनीं आजीला जितीच पेवांत टाकली अन् पेव बंद करून घेतलं.

**दिनकरः**–अरे बापरे ! अरे, काय सांगतोय्स काय तूं ?

**बाजीरावः**–जें खरं तेंच ! लगेच आजोबांनीं दुसरं लग्न केलं. ती दुसरी आजी मात्र गरीब गाय होती. आजोबांनीं कांहींही धांगडधिंगा घातला तरी ती तोंडांतून कधीं शब्द काढीत नव्हती.

**दिनकरः**–पण त्या पहिल्या आजीच्या मृत्यूबद्दल कांहींच वाच्यता झाली नाहीं ?

**बाजीरावः**–कुठं उःस्स झालं नाहीं. जेव्हां चार वर्षांनीं अमाप सुगी आली अन् पेवं भरायचीं ठरलीं, तेव्हां त्या आजीचं तें वाळलेलं प्रेत बाहेर काढलं आणि मागल्या परड्यांत पुरून टाकलं. संपलं सगळं !

**दिनकरः**–अरे बापरे ! हें सगळंच भयंकर बाबा !

**बाजीराव:**–अरे, भयंकर काय त्यांत? तुझ्यासारख्या पुरुषानं असं घाबरून जायचं नाहीं. असल्या गोष्टीला तयार व्हायचं! साथ द्यायची!

**दिनकर:**–म्हणजे तूं असलंच कांहीं करणार कीं काय?

**बाजीराव:**–मी काय करणार तें मग सांगतों. अगोदर तो ग्लास उचल अन् मला वचन दे, कीं वाटेल त्या कामांत तुला साह्य करीन आणि त्याची वाच्यता कुठंही करणार नाहीं म्हणून!

**दिनकर:**–अरे, काम काय तें तरी सांग अगोदर.

**बाजीराव:**–तें भयंकर आहे. पण हें बघ, अगोदर वचन नी नंतर काम.

**दिनकर:**–बरं, हें घे बाबा वचन. [ हातावर हात मारतो. ] हं, सांग आतां.

**बाजीराव:**–ऐक. [ आंतला कानोसा घेतो. तोंच बाजूच्या खिडकींतून आंतल्या बाजूनें सगुणा डोकावते. ती प्रेक्षकांना दिसते. त्या दोघांना दिसत नाहीं. ] आज रात्रीं, मला विरोध करणाऱ्या या बायकोचा मी निकाल लावणार आहें. [ दिनकर दचकतो. सगुणा दचकते. ]

**दिनकर:**–[ घाबरून ] बाऽजी, बाजी!

**बाजीराव:**–[ त्याचा हात धरून ] ये, डरतोस काय साला! अरे, तुला कांहीं करावं लागणार नाहीं. तूं फक्त वाड्याच्या बाहेर पाळतीवर रहा. बाकीचं माझं मी आंत सगळं करतों. आजोबांचा नातू आहें मी! त्यांनीं जसा आजीचा शेवट केला तसाच मीही आज रात्रीं हिचा निकाल लावणार! पेवांत तिला कायमची गाडणार!

**दिनकर:**–बाजी, भयंकर आहे रे हें! तुझ्या आजोबांच्या वेळची परिस्थिति निराळी होती. आतां कुठं वाच्यता झाली तर तुला न् मलाही फांसावर जावं लागेल.

**बाजीराव:**–काय म्हणालास, फांसावर? अरे, काय शुद्धीवर आहेस का दारू जास्ती झालीय तुला? म्हणे फांसावर! अरे, राजरोस परक्यांचे खून करतायत तरी त्यांना कुणी फांसावर चढवीत नाहीं अन् स्वतःच्या बायकोला

मारली म्हणून मी फांसावर जाणार? शक्यच नाहीं; आणि हें बघ, कोण चढवणार फांसावर मला? सरकारच ना? पण सध्यां कुठलं सरकार राज्य करतंय, जरा आठवण कर. अरे बाबा, चोराला सोडून संन्याशाची पूजा करणारं अहिंसावादी सरकार जोंपर्यंत राज्य करतंय तोंपर्यंत कुणालाच अन् कसल्याच शिक्षेची भीति नाहीं!

दिनकरः–पण, पण...

बाजीरावः–पण नाहीं न् बिन् नाहीं. शिवाय अण्णा आहेतच कीं आपले. गेल्या वर्षी त्या सोनाराच्या भानगडींत त्यांनीं काय केलं आठव कीं! या वेळीं त्यांना तेवढेसुद्धां कष्ट पडणार नाहींत. लक्षांत ठेव. आज रात्रीं अगोदर मैनेच्या घरीं आणि मग मध्यान्हींच्या सुमारास इथलं काम–काय? उचल हा ग्लास. काय घ्यायची ती आतांच घे. पण रात्रीं मात्र सावध रहा.

दिनकरः–नको बाबा, पुरे. चल जाऊं या आतां बाहेर.

बाजीरावः–चल, पण आतां बाहेर फिरायला नको. सरळ चंपाकडेच जाऊन पडूं या. [ जाऊं लागतात. ]

सगुणाः–[ बाहेर येऊन ] कुठं निघालां या वेळीं? मागं फिरा.

बाजीरावः–कुठंही जाईन. तूं चवकशी करूं नकोस.

सगुणाः–आणि तो कोण आहे तुमच्याबरोबर? त्या माणसाला इथं कशाला आणलंत?

बाजीरावः–माझा मित्र आहे तो. तो इथं येणार. मी त्याला आणणार!

सगुणाः–वाटेल त्या नादान माणसाला मी माझ्या घराची पायरी चढूं देणार नाहीं.

दिनकरः–ऐक. बाजी, ऐक वहिनीचे हे उद्गार—

बाजीरावः–माझ्या दोस्ता, दिन्या, बोलूं दे रे तिला. तूं सहन कर. माझ्यासाठीं. फक्त आजच्या दिवस. चल. [ जातात. ]

सगुणाः—आजच्या दिवस—फक्त आजच्या दिवस! आणि उद्यां? उद्यां काय होणार माझं? खरंच हे बोलल्याप्रमाणें करणार काय? तसं झालं तर...

### पद्य नं. २

दिवस उद्यांचा उगवेल कसा?
पुढचा बाई कुणा भरंवसा?
मळे मनींचे सुकुनी जाती
जळती आशेच्या फुलवाती
व्यर्थ जीव जगीं धडपडताती—
कोळ्या हातीं दुबळा मासा
पांडव गेले वनवासाला
रामचंद्र सीतेस्तव रडला
दैव छळी त्या नळराजाला
देईल मग मज कोण दिलासा?

[ गाणें संपल्यानंतर ती विचारमग्न उभी राहते. त्यावेळीं राघुअण्णा बाहेरून येतात. ती दुःखाच्या आवेगानं पुढें होते आणि रडत बोलूं लागते—]

सगुणाः—मामाजी, मामाजी, ते भेटले का तुम्हांला? ते आणि दिनकर आतांच दारू पिऊन बाहेर पडले. जा त्यांचेमागें. त्यांना पकडा आणि पोलिसांच्या ताब्यांत द्या—

राघुअण्णाः—सगुणा, सगुणा, असं काय बोलतेस?

सगुणाः—त्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं आतां! ते पोलिसांच्या ताब्यांत जातील तरच मी सुटेन. भयंकर बोलून गेले ते. आज माझा घात होणार. ते माझा निकाल लावणार! मामाजी, आपल्या कुळाचं काय होणार? माझ्या शिवाजीला कोण वाढविणार? आपला कुलदीपक कसा तेवत राहाणार?

राघुअण्णाः—काय, बोलला तरी काय तो?

**सगुणाः**—त्यांच्या आजोबांनीं काय केलंवतं? त्यांनीं जसा आपल्या बायकोचा निकाल लावला तसाच माझा लावायचा निश्चय केलाय त्यांनीं!

**राघुअण्णाः**—त्याच्या आजोबानं केलं तसं तो करणार? शक्य नाहीं. सगुणा, शक्य नाहीं तें! मी मरेन, त्याला मारीन—ठार करीन. पण तुला मरूं देणार नाहीं.

**सगुणाः**—नाहीं मामाजी, तुमच्याकडून कांहीं होईल अशी मला आशा वाटत नाहीं. त्यांचा निश्चय म्हणजे दगडावरची रेघ. मी मरणार—माझा निकाल लागणार. शिवा, माझा शिवा—माझा बाळ, माझ्या बाळासाठीं, आपल्या कुलदीपकासाठीं, आपल्या घराण्यासाठीं मी जगलंच पाहिजे. मी मरणार नाहीं. मी आतां तयारी करणार. फार मोठी तयारी. मारण्याची तयारी—

**राघुअण्णाः**—कुणाला?

**सगुणाः**—कुणाला? [ बरळल्याप्रमाणें ] माझ्या पतीला, तुमच्या पुत्राला—

**राघुअण्णाः**—सगुणा, पोरी! काय बोलतेस? शुद्धीवर आहेस का तूं?

**सगुणाः**—[ दांत ओठ खाऊन ] पूर्ण शुद्धीवर आहें मी! मामाजी, पुन्हां ऐका. आज रात्रीं—आज रात्रीं त्यांच्या अगोदर मीच त्यांना मारणार—पतीचा खून करणार!

[ राघुअण्णा दिङ्मूढ होतात. पडदा पडतो. ]



# तिसरा अंक

[ तिसऱ्या दिवशीं रात्रीं ११ वाजतां ]

[ सगुणेच्या मांडीवर शिवाजी झोंपला आहे. त्यास ती थोपटीत आहे. जवळच राघुअण्णा चिंताक्रांत बसले आहेत.]

सगुणाः—किती वेळ तुम्ही असे बसणार आतां? मध्यान्ह झाली असेल! जा तुम्ही; झोंपा जा.

राघुअण्णाः—नाहीं सगुणा, आजची रात्र वैऱ्याची आहे. मला खडा पहारा केला पाहिजे. या वयांत आणि स्वतःच्या घरांत दुर्दैवानं माझ्यावर आणलेली ही पहारेकऱ्याची पाळी मला आज पार पाडलीच पाहिजे.

सगुणाः—पण कशाला तुम्ही ही तसदी घेतां?

राघुअण्णाः—घरांतल्या भयंकर घटना उद्यां जगाला दिसूं नयेत किंवा सांगायची पाळी येऊं नये म्हणून, आणि जीवनभर सांभाळलेली प्रतिष्ठाही उद्यां तुरुंगाची पायरी चढून खाक होऊं नये म्हणून!

**सगुणाः**–पण तुमच्यावर ती पाळी येईल कशी ?

**राघुअण्णा:**–आली नाहीं तरी ती मला स्वीकारावी लागेल! आज तूं तुझी प्रतिज्ञा पूर्ण केलीस तर उद्यां कोण जाणार तुरुंगांत ? तूं ? तुला दाखविणार मी तुरुंगाची वाट ? या माझ्या एकुलत्या एका कुलदीपकाच्या सच्छील आईला, का माझ्या मान्यवर घराण्याच्या पवित्र लक्ष्मीला मी तुरुंगांत धाडणार ? सांग, काय करणार उद्यां मी ? काय सांगणार जगाला ? अरेरे, असला प्रसंग येण्यापेक्षां—

**सगुणाः**–नको. मामाजी, तसं बोलूं नका. तसा प्रसंग तुमच्यावर येणार नाहीं.

**राघुअण्णाः**–नाहीं ? खरंच नाहीं ना ? मग तसं वचन दे मला !

**सगुणाः**–वचन ? मी मरायचं वचन देऊं ना तुम्हांला ? तेंही देतें मी तुमच्यासाटीं ! पण तुम्ही माझ्या या बाळाची आण घेऊन मला सांगा; माझ्या या बाळाचं, माझ्या लाडक्या शिवाचं रक्षण करीन, त्याला वाढवीन, त्याला मोठा करीन ! मग माझं कांहींही होवो ! त्याची मी पर्वा करणार नाहीं.

**राघुअण्णा:**–सूनबाई, असं बोलूं नकोस. आपला बाळ तुझ्या हातूनच वाढला–मोठा झाला तरच तो सद्गुणी निपजेल, घराण्याचं नांव उजळ करील. एरवीं तें सामर्थ्य त्याला लाभणार नाहीं.

**सगुणाः**–हें कळतंय ना तुम्हांला ? मग कां मला वचन मागतां ?

**राघुअण्णा:**–सूनबाई, मी जें वचन तुला मागतोंय तें मरणाचं नाहीं, मारण्याचं नाहीं ! जगण्याचं आणि जगविण्याचं वचन दे मला.

**सगुणाः**–नाहीं. तें आतां शक्य नाहीं. ज्या दोन्ही विरोधी गोष्टींची तुम्ही अपेक्षा करतां त्यांची आतां शक्यता नाहीं. त्यांतली एक कुठली तरी घडणारच. मग ती माझ्या मरण्याची असो, नाहीं तर मारण्याची असो. ती टाळणं आतां माझ्या हातीं नाहीं, तुमच्या हातीं नाहीं, दैवाच्या तर नाहींच नाहीं ! संत तुकारामाचं वचन आहे ना, 'जें जें होईल तें तें पाहावें' ? आजपर्यंत आपण तेंच करीत आलों आणि यापुढेंही तेंच पाहात

राहण्यावांचून आपल्या हातीं काय आहे ? जा, झोंपा जा तुम्ही. तुम्हांला जागरण सोसत नाहीं. मामाजी! थोड्याशा जागरणानंही तुम्हांला त्रास होतो.

**राघुअण्णा**:–होऊं दे आतां काय व्हायचं तें! मी अस्सा बसून रहाणार! काय होईल जागरणानं ? पडसं होईल, खोकला येईल आणि दमा वाढेल एवढंच ना ? आतां मध्यान्हीपूर्वींच या गोष्टी झपाट्यानं वाढत जाऊन त्यांतच या जिवाचा अंत झाला तर...

**सगुणा**:–मामाजी!

**राघुअण्णा**:–कांहीं बोलूं नकोस ! उद्यां जिवंतपणीं भोगाव्या लागणाऱ्या मरणाच्या यातनांपेक्षां असा मृत्यु येणं मला मोठं भाग्याचं वाटेल! पण दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या माणसाला असं भाग्य तरी कुठून लाभणार ?

**सगुणा**:–तशा भाग्याची तुम्ही अपेक्षा करण्यापेक्षां होऊं द्या माझंच काय व्हायचं तें! माझ्याबद्दल मला कधीं तिळमात्रही फिकीर वाटली नाहीं. पण हा माझा बाळ, माझा शिवाजी, शिवा!

**शिवाजी**:–[ दचकून ] आई!

**सगुणा**:–बाळ, बाळ! झोंप. [ थोपटत ] जा, मामाजी तुम्ही! मी कांहीं करणार नाहीं. तुम्ही खात्री ठेवा.

**राघुअण्णा**:–हेंच पाहिजे होतं मला. सूनबाई, अशी शहाणी हो. दुपारीं त्यानंही शपथ घेतलीय माझ्यासमोर. तोही कांहीं करणार नाहीं.

**सगुणा**:–नको. मला कांहीं सांगूं नका. जा तुम्ही!

**राघुअण्णा**:–बाळाला झोंपव आंत. जा, तूंही जा आंत. [वर जातात]

**शिवाजी**:–आई, रडतेस तूं ?

**सगुणा**:–नाहीं बाळ, झोंप तूं!

**शिवाजी**:–डोळ्यांत पाणी कां तुझ्या ?

**सगुणा**:–[ डोळे चोळीत ] डोळ्यांत कांहींतरी गेलंय. हं, झांका पाहूं डोळे. मी थोपटतें हं.

शिवाजीः–आई, मला झोंप येत नाहीं. तूं गाणं म्हण.

सगुणाः–म्हणतें हं. [ थोपटीत म्हणतें— ]

## पद्य नं. ३

कुलदीपक माझा तान्हा
पदराखालीं झांकिन मी गोकुळिंचा कान्हा
शतजन्मींची पुण्याई आली माझ्या कुशीं
परंपरा गृहरत्नांची ही सोनंच बावन्कशी
दृष्ट लागतां दौलतिला या, कुरवंडिन प्राणा
नवलाखाचा मुकुट याच्या चढेल डोईवरी
गांवकरी या करितिल मुजरे शोभेल राजापरी
अंबाबाई ! राखी बाई, माझ्या अभिमाना

[ गाण्याचा शेवटचा चरण म्हणत म्हणत ती त्याला आंत घेऊन जाते. त्याला झोंपवून थोपटत शेवटचा चरण संपवतांना आपणही तेथें कलंडते. एक मिनिट शांतता. नंतर बाहेर मोटारचा आवाज होतो. दार ठोठावून दिनकर घाबऱ्या घाबऱ्या बाहेरून हांका मारतो. ]

दिनकरः–[ बाहेरून ] राघुअण्णा, वहिनी, वहिनी !

[सगुणा उठून बाहेर येते. प्रथम दाराकडे जाते. पण परत जिन्याकडे वळून–]

सगुणाः–मामाजी, खालीं या. बाहेर कुणी तरी आलंय.

[ क्षणभरांत राघुअण्णा खालीं येतात. ]

दिनकरः–अण्णा, अण्णा ! दार उघडा लवकर. [ राघुअण्णा दार उघडतात. दिनकर आंत येऊन घाबऱ्या घाबऱ्या बोलतो. ] अण्णा, घात झालाय. बाजीराव मारामारींत सांपडलाय. बराच मार लागलाय त्याला असं हाळटेकावरचा माणूस सांगत आलाय.

राघुअण्णाः–कुठाय तो माणूस ?

दिनकरः–बाहेर आहे; मोटारींत.

राघुअण्णाः–पण बाजी इतक्या लांब हाळटेकावर कशाला गेला ?

दिनकरः–कशाला न् काय तें कांहीं समजत नाहीं. पण घायाळ होऊन पडलाय तो. त्यानं वहिनीला बोलावलंय. मी यांना घेऊन पुढं जातों. तुम्ही डॉक्टरला घेऊन या !

राघुअण्णाः–गाढव आहेस काय दिन्या ? यावेळीं अन् सूनबाई बाहेर येणार ? गाढवा, कांहीं अक्कल आहे का ? शक्य नाहीं ती येणं. चल, आपण जाऊं !

दिनकरः–मग असं तरी करा. चला, तुम्ही पुढं व्हा. मी डॉक्टरला घेऊन येतों.

राघुअण्णाः–हॉं; तसं करूंया वाटल्यास–चल.

[ अत्यंत घाईनें जातात. जातां जातां दिनकर सगुणेकडे विषारी दृष्टिक्षेप टाकतो. पण तिचं लक्ष नसतं. एकंदर प्रकारानं ती दिङ्मूढ अवस्थेंत उभी असते. पार्श्वसंगीत सुरू आहे. कांहीं क्षणानं ती गाणं म्हणते—]

सगुणाः–

## पद्य नं. ४

कठिण बना कानांनो ! आतां
ऐकायातें गोष्ट भयंकर
सौभाग्याच्या चंद्रावरती डाग दिसतसे जरी
पवित्र पुण्याईनें पुसुनी टाकिन मी तो परी
जरि रुसते, कटु वदते प्रीती परंतु माझ्या उरीं
राजासाठीं झुरते राणी, मंगल मी चिंतितें निरंतर
चिंतेनें हुरहुरतें यांच्या, हळवें मम अंतर
सतीपणाचें छत्र माझिया धरीन सखयावर
पाप तयांचें घेउनि माथां चढेन फांसावर
सुखी असो सौभाग्य सतीचें विनवितसे
सुखकर शिवशंकर ॥

[ गाणें संपल्यावर बाहेर मोटारचा आवाज. " वहिनी, वहिनी दार उघडा. बाजीरावाला आणलाय " असा दिनकरचा आवाज. सगुणा दार उघडते. एकटा दिनकर आंत येतो. मागें वळून तो प्रथम सांगतो—]

**दिनकरः**–शोफर, गाडी बाजूला उभी कर. अन् तूं बाहेर उभा रहा. आंत कुणालाही सोडूं नकोस. [ दार झांकतो. ]

**सगुणाः**–म्हणजे ? हें काय दिनकर ? त्यांना आणलं नाहीं तुम्हीं ?

**दिनकरः**–यावेळीं त्याला इथं आणण्याइतका मी मूर्ख नाहीं. मी त्याला आणायला गेलों, हें खरंच वाटलं ना तुला ? पण तें सगळं खोटं. खरं तें ऐक आतां. मी त्याला आणायला गेलों नाहीं, उलट त्या तुझ्या म्हाताऱ्याला मात्र बाहेर घालवून आलों.

**सगुणाः**–पण ते कुठायत ? त्यांना मार लागलाय ना ?

**दिनकरः**–कोण ? बाजी अन् मार खाणार ? कच्च्या गुरूचा चेला नाहीं तो. माझा दोस्त आहे. त्याची कांहीं काळजी करूं नकोस. पूर्ण सुरक्षित आहे तो.

**सगुणाः**–पण कुठं ?

**दिनकरः**–मैनेच्या महालांत !

**सगुणाः**–काय ? मैनेच्या घरांत ! दिनकर, दिनकर, काय केलंत तुम्हीं हें ?

**दिनकरः**–आडव्या येणाऱ्या गंगारामाचा आम्हीं निकाल लावला. काल तिनं केलेल्या बाजीच्या अपमानाचा सूड आहे तो. सापाला निष्कारण डिवचूं नये हें आतां तिला कळलं असेल. तिला बाजीरावाच्या ताब्यांत दिली आणि मगच मी इकडे आलों.

**सगुणाः**–आणि मामाजी ?

**दिनकरः**–तो म्हातारा गेला आतां खूप दूर हाळटेकावर फिरायला. तिथली गार हवा खाऊन येईल सावकाश तास दोन तासांनीं परत—तोंपर्यंत आपणाला आतां कोणाचीच भीति नाहीं !

**सगुणाः**–तुम्हीं हें आरंभलंय तरी काय ?

दिनकरः—हात्तिच्या ! एवढंही कळत नाहीं तुला ? इतकी तुझी अक्कल मंद असेल असं वाटलं नव्हतं मला. वहिनी, सगुणे, कान उघडे ठेवून ऐक. हें दुसरं तिसरं कांहीं नाहीं. काल तूं माझ्या गालावर केलेल्या त्या निशाणीचं हें रोखठोक उत्तर आहे.

सगुणाः—दिनकर, इतक्या उलट्या काळजाचे आहांत तुम्ही ?

दिनकरः—मुळांत काळीज असलं तरच तें उलटं सुलटं होण्याचा प्रश्न. सगुणे, मी बिनकाळजाचा माणूस आहें !

सगुणाः—हॉं. तें दिसतंयच म्हणा. पण मला काळीज आहे कीं ! त्याचं काय करायचं ? थांबा, मी माझं काळीजच काढून टाकतें [ आंत जाऊं लागते. ]

दिनकरः—[ आडवा होत ] आंत जाऊन काय हत्यार घेणार कीं काय ? वेडे, काळीज फार नाजुक असतं ना ? त्याला हत्यार कशाला पाहिजे ?

सगुणाः—[ थांबून, विचार करून आणि कांहीं निश्चय ठरवून त्याच्याकडे पाहात पवित्रा बदलून ] हो, खरंच कीं ! तुमचा हळुवार प्रेमळ स्पर्श असल्यावर हत्याराची काय गरज ? पण हें पाहा, मला फार भीति वाटते; आतां कुणी येणार तर नाहीं ना इथं ? तसं झालं तर आपलं सगळंच गुपित फुटणार !

दिनकरः—तो सगळा बंदोबस्त केलाय मीं.

सगुणाः—अस्सं ? किती चांगले आहांत तुम्ही दिनकर ! माझ्यासाठीं केवढी तसदी घेतलीत ही ! तुमचा हा जिव्हाळा नि चांगुलपणा पाहिला कीं मला घरच्या माणसांची अगदीं शिसारी येते.

दिनकरः—येणारच ! अन् म्हणून तर तुझ्यासाठीं माझा जीव फार तळमळतो. कालच नाहीं का मी बोललों, कीं बाजीराव बाहेर चैनींत नी सुखांत सदैव दंग असतो. तो तुझ्या सुखाची काडीमात्र फिकीर करीत नाहीं. उलट तुला त्रास देण्याचाच विडा उचललाय त्यानं !

सगुणाः—मला आतां संवय झालीय त्यांच्या त्रास देण्याची. मी तें सगळं सहन करायला शिकलेंय. त्याशिवाय दुसरं करणार तरी काय बरं मी ?

**दिनकरः**–अग, पण आतां सहन करण्याचा प्रश्न नाहीं. तो भलतंच धाडस करणार आहे आज !

**सगुणाः**–म्हणजे ? असं आहे तरी काय तें ?

**दिनकरः**–तें फार भयंकर आहे अन् त्यांतून तुला वांचवावी म्हणूनच केवळ मी असा धांवत आलों. वहिनी, सगुणे, तो बाज्या आज तुला जगांतूनच नाहींशी करणार आहे !

**सगुणाः**–ऑं ? काय सांगतां हें ? अरे देवा, मग मला वांचविणार कोण ?

**दिनकरः**–मी आहें ना ? मुळींच घाबरूं नकोस वहिनी !

**सगुणाः**–खरंच वांचवाल तुम्ही ? मी चुकलें असलें, तुमचा अपराध केला असला तरी दिनकरभावोजी, तुम्ही वांचवा हो मला. झाल्यागेल्याबद्दल मला क्षमा करा. मी तुमची आहें !

**दिनकरः**–खरंच तूं माझी आहेस ? असं बोललीस तर मी त्याला तुझ्या केसालासुद्धां धक्का लावूं देणार नाहीं. तो गांवाला अन् घराला माजलेला पोळ असला तरी माझ्यापुढं नुसतं मेंढरू आहे. तूं पाहात रहा. तूं माझी झालीस तर त्याला तुझ्या पायावर डोकं घांसायला लावीन. [ उठून जवळ जात ] खरंच सगुणे, तूं माझी ना ?

**सगुणाः**–[ लांब जात ] हो, खरंच मी तुमची. मला वांचवणं आतां फक्त तुमच्याच हातीं आहे.

**दिनकरः**–सगुणे, लाडके ! [ हात धरण्याचा प्रयत्न करतो. ]

**सगुणाः**–पण आतां अशी उतावीळी कां ? तुम्ही बसा तेथें निवांत. आतां वेळही आपणाला खूप आहे. मी तुम्हांला उत्तम दारू देतें.

**दिनकरः**–खरंच ! आज तूं किती चांगलं बोलतेस ? जणुं स्वर्गांतली देवताच ! देवी, आतां तुम्ही सांगाल तसं आम्ही वागणार !

**सगुणाः**–मग बसा तर तिथं. [ कपाटांतील अस्सल मद्यार्काची बाटली काढते. पेला भरून त्याला देते. ] हं, घ्या पाहूं. आज खूप देणार आहें हं मी तुम्हांला ! अगदीं पुरे होईस्तवर !

**दिनकरः**—वा, वा ! आज काय बहारच होणार मग. [पितो.] अहाहा ! फारच उंची आहे ही बाटली. इतके दिवस आम्ही इथं पितोंय. पण बाजीरावनं असली दारू कांहीं आम्हांला दिली नाहीं.

**सगुणाः**—स्वार्थी आहेत ते. त्यांनीं ही स्वतःकरितां निराळी ठेवली होती. आज केवळ तुमच्यासाठीं ही मीं काढली. घ्या. [पुन्हां पेला भरते. तो पितो. ती पुन्हां भरूं लागते.]

**दिनकरः**—नको, लाडके, पुन्हां भरूं नकोस. असल्या दारूचा एकच पेला भारी होतो. मीं दोन घेतले. फारच जहाल आहे ही. मला कसं तरी व्हायला लागलंय. सगुणे, तूं एकच आहेस ना? [चोहोंकडे पाहात] मग या इतक्याजणी तुझ्याचसारख्या कोण माझ्या भोंवतीं फिरताहेत?

**सगुणाः**—हा एक पेला घ्या [भरून देते] म्हणजे त्या सगळ्याजणी तुम्हांला कुरवाळूं लागतील !

**दिनकरः**—नको, वहिनी, फार झालं. मला कांहीं सुचत नाहीं.

**सगुणाः**—माझ्यासाठीं ! माझ्यासाठीं नाहीं का घेणार तुम्ही हा एवढा एकच प्याला? घ्या, माझ्यासाठीं घ्या !

**दिनकरः**—तुझ्यासाठीं ! केवळ तुझ्यासाठीं म्हणूनच घेतों. [पितो.] झालं तुझं समाधान? तुझं ऐकण्यासाठीं, तूं करशील ती आज्ञा सेवकाप्रमाणें मानण्यासाठीं माझा जीव सदैव आतुर होता. पण तशी संधीच आजपर्यंत तुझ्याकडून मिळाली नव्हती. आणि काल तर मी सर्वस्वीं निराश झालों होतों. त्या निराशेच्या भरांत मीं काय केलं असतं तें सांगतां येत नाहीं. पण मी कांहीं करायच्यापूर्वीं तूंच आज पूर्णपणानं बदललीस. मी जसा चकित झालों तसाच खूप सुखीहि ! आयुष्यांतलं महत्तम सुख मला आज अचानक मिळणार ! जें कल्पांतींही घडणं शक्य नव्हतं तें आज आपसूक होणार ! निराशेच्या भयाण अंधारांत आज वीज चमकणार ! बाकी तुम्हां बायकांचा स्वभाव हा विजेसारखाच लहरी ! क्षणांत सोन्यासारखी डोळे दिपविणारी तेजस्वी चमक, तर दुसऱ्याच क्षणीं कानठळ्या बसविणारा भयानक स्फोट !

**सगुणा:**–हाँ, अगदीं योग्य बोललांत. बायका बरोबर विजेसारख्याच असतात. विजेची चमक डोळ्यानं बघतां येते, पण वीज कुणाच्याच हातीं लागत नाहीं.

**दिनकर:**–माझ्यासारखा धरणारा भेटला तर—

**सगुणा:**–त्याला ती जाळून ठार करील.

**दिनकर:**–पण माझी ही वीज– [ उठून तिला धरण्याचा प्रयत्न करतो. पण त्यास बरोबर चालतां येत नाहीं. झोक जातात. ] सगुणे, अशी दूर कां पळतेस ?

**सगुणा:**–मी सगुणा आहें म्हणून.

**दिनकर:**–मग मी–मी काय तुला मैना समजतोंय ?

**सगुणा:**–मैनाच का, एकादी कोयनासुद्धां समजशील. नादान माणसाची मजल कुठवर जाईल तें सांगतां यायचं नाहीं. पाटलाच्या संगतीनं शेफारून तूं पाटलिणीवरच डोळा ठेवायची हांव धरलीस. पण पाटलीण ही एक स्त्री नाहीं, नुसती चमकणारी वीजही नाहीं तर ती जाळणारी आग आहे, हें तुला आज दिसेल !

**दिनकर:**–अँ ? काय, बोलतेस काय ? पुन्हां लहर फिरली कीं काय तुझी ? पण लक्षांत ठेव, इथं पूर्णपणानं तूं माझ्या ताब्यांत आहेस. मी आज तुझ्या असल्या गमजा चालूं देणार नाहीं.

**सगुणा:**–पाटलाच्या संगतीनं सगळ्या गांवावर तुला असली दमदाटी करतां येईल. पण या पाटलाच्या घरांत–खानदानी पाटलाचं घर म्हणजे काय तुला सार्वजनिक धर्मशाळा वाटली ? लाथेच्या ठोकरीनं मी आतां तुला या घराबाहेर हाकलून देईन. नीचपणाचा डाव तूं बरोबर टाकला होतास पण तो डाव तुझ्यावरच उलटला ! त्यांच्या दारूच्या व्यसनाला मी सदैव तिरस्कारीत आलें. पण तीच दारू आज माझ्या उपयोगीं पडली. माझी साह्यकर्ती झाली. नादान माणसा, उंची दारूच्या नांवाखालीं मीं तुला अस्सल मद्यार्क पाजलाय. तुला आतां कांहींही हालचाल करतां येणार नाहीं.

थोडीशी शुद्ध आहे तोंवरच तुझ्या शोफरला बोलाव आणि घडपणानं आपल्या घरीं जाऊन पड. नाहीं तर...

**दिनकरः**—नाहीं तर...काय करणार तूं? मोठी सती आहेस हें मला माहीत आहे. म्हणून तर मीं सगळं कारस्थान रचलं आणि आतां रिकाम्या हातानं जाऊं? तें शक्य नाहीं. सगुणे, बऱ्या बोलानं तूं ऐकलं नाहींस तर मला बळजबरी करावी लागेल. चल, इथं माझ्याजवळ ये.

**सगुणाः**—काय म्हणतां, तुमच्याजवळ येऊं? थांबा महाराज, जरा आंतलं हत्यार घेऊन येतें, तुमचे ते पवित्र हात कापायला आणि ती मंगल जीभ छाटायला! [ आंत जाऊं लागते. ]

**दिनकरः**—[ उठत ] सगुणे, थांब. [ चालण्याचा प्रयत्न करतो. पण तोल जातात. मध्येंच पडतो. ]

**सगुणाः**—दिनकर, जास्त बडबडायचं नाहीं. शोफरला बोलावून सरळ बाहेर जाणार का माझ्या लाथेनंच बाहेर ढकलायची पाळी आणणार शेवटीं?

**दिनकरः**—ये, लाथेनंच ढकल मला बाहेर. आतां तुझ्या त्या तेवढ्या स्पर्शांतसुद्धां मी आनंद मानीन. ये, सगुणे, लाथ देण्यासाठीं तरी माझ्याजवळ ये!

**सगुणाः**—अस्सं? म्हणजे लाथ द्यायची झाली तर त्यासाठीं तुझ्याजवळ यावं लागणार—नाहीं का? मग नाहीं. तेवढीही तुझी लायकी नाहीं. माझी लाथसुद्धां तुला मिळणार नाहीं! [ बाहेर दार ठोठावलें जातें आणि हांका सुरू होतात. "अण्णा, अण्णा, सगुणे!" सगुणा दाराकडे जाऊं लागते. दिनकर तिला आडवा होण्याचा प्रयत्न करतो. ]

**दिनकरः**—सगुणे, दार उघडूं नकोस. थांब, मला इकडच्या दारानं बाहेर तरी पोंचव. नाहीं तर जर मला इथं कुणीं पाहिलं तर निष्कारण माझ्या अब्रूला बट्टा लागेल.

**सगुणाः**—इभ्रत, अब्रू, दानत हे शब्द तरी कानावरून गेलेत म्हणायचे! [ दाराजवळ जाऊन विचारते— ] कोण आहे?

**मैना:**–[ बाहेरून ] तुझी सवत मैना. दार उघड अगोदर. [ सगुणा गडबडीनें दार उघडते. अत्यंत भकास अवस्थेंत केंस सोडून आरडत ओरडत मैना आंत धांवते. सगुणेच्या गळां पडून– ] सगुणे, सगुणाबाई, माझ्या जन्माचा सत्यानाश झाला. जीवनभर जोपासलेलं शील आज मातीला मिळालं ! काय करूं मी आतां ? सांग, काय करूं ?

**सगुणा:**–मैना, मैना !

**मैना:**–कुठाय तो म्हातारा ? सांग, त्यानं मला वचन दिलं होतं. कुठं गेलं त्याचं वचन ? कुठं गेला त्याचा मोठेपणा, दरारा ? आतां मी त्याच्या पायावर डोकं आपटून प्राण देणार ! सांग, माडीवरच आहे ना तो ?

**सगुणा:**–नाहीं, मैना ते वर नाहींत !

**मैना:**–मग कुठं गेला बाहेर ? [ दाराकडे पाहाते. दिनकर हळुहळू सरकत बाहेर जाऊं लागलेला असतो. त्याच्याकडे पाहून ] आणि हा कोण ? हा मांग, हा चांडाळ इथं कसा ? यानंच सगळा घात केला. [ त्वेषानं दिनकरला तीनचार लाथा हाणते. खवळलेल्या नागिणीप्रमाणें ती त्याला ठोकरत राहाते. सगुणा तिला आवरण्याचा प्रयत्न करते. ] यानंच गंगारामाला बाहेर नेऊन पाटलाला माझ्या घरांत घातला. थांब, याच्या नरडीचा घोट घेतल्याशिवाय–[ नरडें दाबायचा प्रयत्न करते. सगुणा तिला धरून आवरते, ‘ शांत हो ’ म्हणते. ]

**सगुणा:**–मैना, मैना शांत हो ! [ दिनकर बाहेर पडतो. ]

**मैना:**–कां शांत हो ? कां त्या मांगाला वांचवतेस ? बोल. कां ? चांडाळणी, सगळं गांव तुला सती म्हणून नांवाजतंय आणि तूं स्वतःच्या पतीला बाहेर घालवून या मांगाशीं...

**सगुणा:**–मैने–[ मैनेच्या थोबाडींत देते. ]

**मैना:**–मार, मार आणखी. पण तुझ्या या मारानं माझे उघडलेले डोळे मात्र आतां झांकणार नाहींत. मला पुरं कळून चुकलं आतां. जन्मभर सतीत्वाचं सत्त्व जागविणारी मी केवळ हलक्या जातीची अन् नाचणारीण

म्हणून जगाच्या बाजारांत बदफैली ठरणार आणि तूं मात्र असा राजरोस बदफैलीपणा करून या मोठ्या घरामुळें, खानदानीपणाच्या अभ्र्याखालीं आणि कुलीनतेच्या नांवावर सती म्हणून मिरवणार! पण जग जळूं दे तिकडे! विचार तुझ्या जागत्या मनाला. कुठाय तुझी कुलीनता? कुठाय तुझा खानदानीपणा? तो म्हातारा सोडला तर नवरा तसा नादान आणि तूं ही अशी...

सगुणाः–[कान दाबून धरून असह्य यातनांनीं] मैना, मैना, मी तुझ्या पायां पडतें. हें तूं बोलत नाहींस ग! तुझ्यावरचा महान् अन्याय टाहो फोडून आक्रोश करतोय हें मला कळतंय. पण तें मला ऐकवत नाहीं. मैना, ऐकवत नाहीं ग! तूं आतां ज्याला मांग, चांडाळ म्हणालीस तो खरंच तसा असल्यामुळें मीं त्याला वांचविण्याचा प्रयत्न करणं शक्यच नाहीं. मीं फक्त तुझ्या हातून होणारा खून टाळला! एरवीं, तूं थोडा वेळ आली नसतीस तर मींच त्याच्या नरड्यावर घाव घातला असता. तुझे मी इतर वाटेल ते आरोप सहन करीन. पण हा माझ्या सतीत्वावरचा तुझा घाव मात्र...तो इथं कसा आला तें ऐक तरी...

मैनाः–सांग, कसा आला तो इथं?

सगुणाः–मोटार घेऊन आला, मला पळवून नेण्यासाठीं. मी जाणं शक्यच नव्हतं. भयंकर मारामारींत ते जखमी झाल्याची थाप देऊन तो मामाजींना घेऊन गेला आणि त्यांना कुठंतरी सोडून घरांत मला एकटी पाहून तो घरांत घुसला. माझं दैव बऱ्यावर होतं. त्याच्या व्यसनाचा फायदा घेऊन मी त्याला मद्यार्क पाजला. झोकांड्या खातही तो अत्याचार करण्याच्या विचारांत होता, तोंच तूं आलीस. अजून मामाजींचा पत्ता नाहीं. सांग, काय झाला माझा बदफैलीपणा?

मैनाः–सगुणाबाई, मला ही कल्पना नव्हती. बघितलेल्या दृश्यानं आणि हृदयावरच्या जब्बर आघातानं माझी जीभ वाटेल तें बरळली. मला क्षमा कर. पण हा मांग [दांतओंठ खाऊन] आणि त्याचा साथीदार तुझा पति यांना मात्र मी आतां जिवंत ठेवणार नाहीं! जातें मी—

**सगुणा**:–थांब मैना. [ तिला धरून ] तुझे दुबळे हात त्यांच्यापर्यंत पोचणार नाहींत. तुला तें जमायचं नाहीं !

**मैना**:–मग कुणाला जमणार? तुला, का तुझ्या सासऱ्याला? तो त्याचा पिता आणि तूं त्याची पत्नी! तुला हें त्याच्या नांवचं कुंकू मिरवायला पाहिजे ना ? तुला कशी त्याची किळस येईल ? माझ्या डोक्यावर निखारे ठेवले. मला माणसांतून उठवलं. त्याच्या नांवानं ल्यालेलं हें कुंकू...

**सगुणा**:–कुंकू ! कुंकवाचा अभिमान धरायची वेळ टळून गेली. हें बघ कुंकू! [ कुंकू पुसून टाकते. तिनें कुंकू पुसल्याबरोबर भेसूर वाद्यमेळ सुरू होतो. मैना हतबद्ध उभी राहाते. सगळं वातावरण भेसूर नी भयाण–मग सावकाश सगुणा म्हणते– ] आतां सांग मला, हे कुठायत? आणि गंगाराम घरीं आला का ?

**मैना**:–आला; आला नी मुडदा होऊन पडलाय त्याचा ! [ हुंदका देऊन ] दिनकर त्याला बाहेर घेऊन गेला. त्याला शंका होतीच, घरांत कांहींतरी दगा होणार म्हणून. मध्येंच तो धांवत घरीं आला. मला दार उघडतां येईना. बाजीराव दार उघडीना. दार मोडून गंगाराम आंत घुसला आणि तो आंत येतांच माझ्या डोळ्यांदेखत बाजीरावनं त्याला जखमी केला. सगुणाबाई, काय करूं मी आतां ? अब्रूपरी अब्रू गेली आणि माझा गंगाराम...

**सगुणा**:–थांब ! [ आंत जाते आणि पैशाची पिशवी आणि सुरा घेऊन येते. ] हें बघ; ही पैशाची पिशवी तुझ्या पतीसाठीं. त्याला आतांच्या आतां दवाखान्यांत ने. उपचार कर. आणि हें बघ; हा सुरा माझ्या पतीसाठीं ! तुझ्यावर झालेल्या महान् अन्यायाचं पारिपत्य उद्यां तुझ्या कानावर येईल ! जा, थांबूं नकोस. वेळ महत्त्वाची आहे.

**मैना**:–पण सगुणाबाई !

**सगुणा**:–मैने, थांबूं नकोस आतां. चालती हो घराकडे; नाहींतर हाच सुरा...[ मैना पळत बाहेर जाते. सगुणा अस्वस्थ उभी. भेसूर वाद्यमेळ.

अस्वस्थपणानं ती येरझाऱ्या घालते. दांतओठ खाते. मध्येंच उभं राहून विचारमग्न. भयंकर नजरेनें सुऱ्याकडे पाहाते व अस्वस्थपणें म्हणते—]

## पद्य नं. ५

आज कां ढळली मनाची शांतता
हें करूं कां तें करूं मी? जाळिते अस्वस्थता
पूर्व-आशा भंगल्या
स्वप्नतारा लोपल्या
देव माझे दैत्य बनले
दशदिशा अंधारल्या
शांत सलिलीं आज लहरी अवचिता
राउळी हे कोठुनी
आज अशुभाचे ध्वनी
आश्रमीं कां नाचताती
नग्न नटव्या भिल्लिणी
कुंभ हंसऱ्या भावनांचा हो रिता
धीर चित्तीं राखितें
कां भयानें कांपतें
थोर वंशाच्या सुखाचा
मार्ग नवखा शोधिते
बधिर झालें संभ्रमीं मी पोहतां ॥

[ थोड्या वेळानें सुरा हातांत घेऊन ती आपल्या खोलींत जाते. उजेड कमी होतो. बाजीराव बाहेरून येतो. इकडे तिकडे कानोसा घेतो. सर्व शांत. बाहेर पाहून गड्यास हांक मारतो— ]

**बाजीराव:**—सुभान, ये सुभ्या! मेला काय लेकाचा इतक्यांत? सुभ्या, ये.

**सुभान:**—[ डोळे चोळीत येतो ] जी! आलों न्हवं का लगीच! काय जी?

बाजीराव:–काय जी काय लेका? हळू बोल. सांगितलेली सगळी तयारी केली?

सुभान:–ॲ हं. [ मानेनंही नाहीं असें दर्शवितो. ]

बाजीराव:–नाहीं? कां?

सुभान:–अओ, आमी तें करायला गेलों. तर अण्णास्नी कसं कळलं काय की. ते नेमकं आलं ततं–वरच्या दोन फरशा दिकून काढल्यवत्या. पण त्येनी दटावतांच घाबरगुंडी उडाली आमची. म्हाद्या गेला पळूनच घरला आन् मी जाऊन पडलों मग पडवींत.

बाजीराव:–आतां, अण्णा आहेत का वरती माडीवर?

सुभान:–न्हाइती. त्यास्नी दिनकरावांनीं मोटारींतून न्हेलंय कुठं भाईर भघांशींच!

बाजीराव:–ऑं? खरं म्हणतोस काय? वारे दिन्या! साला टाळकेबाज आहेच तसा. खरा मित्र! मित्राला साह्य करायचं म्हटलं कीं स्वतःच्या अकलेनं करील. छान छान! मग आतां कांहींच धास्ती नाहीं. दिन्यानं अगदींच फत्ते करून ठेवलीय. मग जा बघूं लगबघ. हें बघ–[ त्याच्या कानांत सांगतो. ] तें अगदीं कोपऱ्यांतलं पेव. चटकन् उकरून ठेव. जा, पळ लवकर!

सुभान:–पण धनीसाब, उद्यां...

बाजीराव:–मी असल्यावर लेका तुला कां काळजी? जा, तें उकरून ठेव आणि मग आपल्या घरीं जाऊन तूं निर्धास्त पड. जा. [ जातो. ]

[ त्यानंतर बाजीराव आपल्या उजव्या बाजूच्या खोलींत जाऊन पलंगावर पडतो. कुठल्यातरी कचेरींत १, २, ३ असे बारा ठोके ओळीनें पडतात. पूर्ण अंधार होतो. बाहेरून प्रकाशझोत. सगुणा सुरा घेऊन उठते. हळुहळू दबकत खोलींतून बाहेर येते. तेथून सावधगिरीनें बाजीरावच्या खोलीकडे जाऊं लागते. तोंच बाहेर बंदुकीचा बार होतो. ती दचकते तरी हळुहळू

पुढें सरकत असते. पुन्हां बंदुकीचा बार आणि दारावर घाड् घाड् असा आवाज होऊन दार मोडलें जातें. दरोडेखोर आंत घुसतात. सगुणेच्या हातांतला सुरा गळून पडतो. ती घाबरून आपल्या खोलींत धांवते. बाहेरचा प्रकाशझोत बंद. दरोडेखोरांच्या हातांतल्या बॅटऱ्या सुरू. ते बाजीरावाच्या खोलींत घुसतात. कपाटें, पेट्या उघडल्याचा, आदळल्याचा आवाज. मारहाण. बाजीरावची बोंब. ]

**दरोडेखोरः**—किल्लया, किल्लया लाव !

**बाजीरावः**—ऑ ! आई ग, किल्लया नाहींत माझ्याजवळ.

**दरोडेखोरः**—किल्लया निकालो जलदी. [ तिजोरीवर ठोके पडल्याचा आवाज. एकाचा बॅटरी लाईट खालीं पडलेल्या सुऱ्यावर. तो उचलला जातो. घराबाहेर लोकांचा गलगा. बाजीरावची करुण किंकाळी "अग आई, मेलों, मेलों." दरोडेखोर गडबडीनें दुसऱ्या बाजूच्या दारानें पळून जातात. "सगुणे" अशी बाजीरावची करुण हांक. प्रकाश पडतो. सगुणा धांवत त्याच्या खोलींत जाते. त्याला सुरा वर्मीं लागलेला असतो. तो रक्तबंबाळ ! "अरे देवा !" म्हणून सगुणा किंचाळते. गडी बाहेरून धांवत येतात. ते हळूच बाजीरावला उचलून बाहेर आणतात. ]

**बाजीरावः**—अग आई ! डॉक्टर, रक्त थांबत नाहीं. दिनकरला बोलवा.

**सगुणाः**—जा, सुभान पळ दिनकरकडे. मोटार नेऊन त्यांना डॉक्टरला आणायला सांग. पण दिनकर आतां कसला जाणार डॉक्टरकडे ?

**बाजीरावः**—कां ? त्याला काय झालंय ? निरोप कळतांच तो धांवेल. जा, पळ लवकर. [ तो जाऊं लागतो— ]

**सगुणाः**—थांब, प्रथम मोटार घेऊन हाळटेकावर जा. तिथं मामाजी असतील. ते करतील सगळीच व्यवस्था. जा, जा लवकर, पळ. [ सुभान जातो. ]

**बाजीराव**:–सगुणे, काळजावरच घाव बसलाय ग ! नाहीं, आतां मी यांतून टिकणार नाहीं.

**सगुणा**:–[ त्याच्या तोंडावर हात ठेवून ] नको. तसलं कांहीं बोलूं नका. आतां डॉक्टर येतील. त्यांनीं ही जखम बांधली कीं—

**बाजीराव**:–नाहीं सगुणे, बांधण्यासारखी ही जखम नाहीं ग. पार हृदयाला भिडलीय. आई, आई ग !

**सगुणा**:–कसली वेळ ? काय प्रसंग आणलासरे हा देवा ?

**बाजीराव**:–सगुणे, देवाला दोष देऊं नकोस. तो चांगल्याचा पाठीराखा असतो. देवानं हा प्रसंग आणला नाहीं. मींच माझ्या कृतीनं ओढवून घेतला.

**सगुणा**:–तुम्हीं कसा ओढवून घेतला ?

**बाजीराव**:–मी–मीच, आई ! सगुणे, जीवनभर मी तुझ्याशीं प्रतारणा करीत आलों असलों तरी आतां या शेवटच्या क्षणीं मला तुझ्याजवळ खरं बोलूं दे ! दुसरं कांहीं नाहीं. तरी अखेरच्या क्षणीं का होईना, पण माझ्या घराच्या देवतेशीं खरं बोलल्याचं समाधान माझ्याबरोबर येईल !

**सगुणा**:–जास्त बोलूं नका. त्रास होतोय तुम्हांला !

**बाजीराव**:–अँ, आई, सगुणे, तुझ्या कपाळाला कुंकू नाहीं ?

**सगुणा**:–[ बावरून ] कुंकू, कुंकू !

**बाजीराव**:–थांब मीच लावतों तुला कुंकू. [ रक्ताचा टिळा लावतो ] आतां माझे डोळे मिटेपर्यंत तरी हें पुसलं जाण्याची भीति नाहीं. सगुणे, आजपर्यंत चारित्र्याला बट्टा लावणारीं, तुम्हा घरच्या लोकांना लाज आणणारीं आणि घराण्याची इभ्रत मातीमोल करणारीं काळीं कृत्येंच मी करीत आलों. तीं सगळीं मला पचलीं होतीं आणि केवळ त्याच उन्मादांत मी आज भयंकर पाशवी कृत्य करणार होतों. सगुणे, तूं निष्ठेनं ज्याची पूजा करीत होतीस तो हा तुझा पति किती नीच होता याची तुला कल्पनासुद्धां करतां येणार नाहीं. तीच मी तुला सांगतों. मी आज तुला जगांतून नाहींशी

करणार होतों. पण माझी ती भयंकर कृति जगांतल्या दैवी सामर्थ्यापुढें दुबळी ठरली. किंबहुना आज निकालांतच निघाली. मला माहीत आहे. तुझ्या कपाळाचं कुंकू सहजासहजीं पुसलं गेलं नाहीं. माझ्या नादान सवालाला दैवानं दिलेला तो क्रूर जबाब होता!

सगुणाः–नाहीं, तसं नाहीं. माझं कुंकू पुसलं गेलं तें...तें...

बाजीरावः–सगुणे, आपला बाळ, शिवाजी कुठाय? त्याला आण माझ्याजवळ! ज्या बाळाला मीं कधीं आयुष्यांत जवळ घेतला नाहीं त्याला एकदां मला कुरवाळूं दे! आण, आण त्याला! [ सगुणा जाऊं लागते. ] पण थांब, थांब, नको आणूस त्याला!

सगुणाः–कां? आणतें ना! घ्या एकदां जवळ त्याला. एकदां तरी हात फिरवा आपल्या बाळाच्या मुखावरून!

बाजीरावः–आई, नको, नको. त्या सुखाची अपेक्षा माझ्यासारख्या अभाग्यानं करूं नये हेंच बरं! नकोच. मला सुख मिळेल पण त्याचं जीवन विटाळेल. नको, सगुणे, अशा अवस्थेंत मी त्याच्या दृष्टीस पडायला नको. किंबहुना माझं हें कलंकित चारित्र्य आतां कायमचं त्याच्या दृष्टीआड होऊं दे! तुझ्या पवित्र हातानं त्याला मोठा कर. तो गुणसंपन्न आणि चारित्र्यसंपन्न झालेला बघ आणि जन्मभर एका नादान पतीची पत्नी म्हणून तुझ्या मनाला डाचणारं शल्य एका सुपुत्राची माता होऊन तूं विसरून जा! सगुणे, तें तरी समाधान आतां तुला मिळूं दे अशी मी देवाजवळ प्रार्थना करतों. आई, पाणी...अँ ऑऽ [ जीव सोडतो. ]

सगुणाः–ऑ? हें काय झालं? [ त्याच्या पायाला मिठी मारून हंबरडा फोडते. ] देवा, देवा, काय केलंस रे हें? आतां मामाजींना मी काय सांगूं? [ राघुअण्णा येतात. ]

राघुअण्णाः–चांडाळणी, चांडाळणी, काय केलंस हें? [ बाहेरून धांवत येऊन बाजीच्या प्रेताला कवटाळतात ] ऑं! पार गार! बाजी, बाज्या...

[ करुण किंकाळी ] बाजी, बाजी, काय झालं रं हें ? पोरा, काय तुझं हें नशीब ? शेवटीं बायकोच्या हातून तुझा शेवट व्हावा ना ?

सगुणाः—मामाजी !

राघुअण्णाः—राक्षसिणी, काय केलंस हें ? मला वचन दिलंस आणि असा डाव साधलास ! माझ्या पोराचा, तुझ्या पतीचा खून केलास—

सगुणाः—मामाजी, मामाजी, मी नाहीं !

राघुअण्णाः—एक शब्द बोलूं नकोस. माझी साध्वी सून म्हणून मी तुझी गांवभर तारीफ करीत होतों. पण आतां, जा तुला फांसावर लटकविल्याशिवाय......

सगुणाः—मामाजी, [ किंचाळून एकदम त्यांचे पाय धरते. ]

राघुअण्णाः—चल, दूर हो, मला आणि या तुझ्या पतीच्या प्रेतालाही स्पर्श करूं नकोस. जा. [ उठून सुरा हातीं घेऊन न्याहाळीत ] बघ. हा सुरा कुणाचा आहे ? तुझाच ना ? चांडाळणी, शीलाच्या रक्षणासाठीं तुझ्या भावानं भेट दिलेला हा सुरा तूं आपल्या सौभाग्यावर चालवलास. काय म्हणावं तुला ? कशी इतकी क्रूर झालीस ?

सगुणाः—[ पुन्हां अण्णांचे पाय धरीत ] मामाजी, तुमच्या या पवित्र पायाची, माझ्या जिवाचा होन असलेल्या माझ्या लाडक्या बाळाची शपथ घेऊन सांगतें; हें माझ्या हातून झालं नाहीं !

राघुअण्णाः—मग कसं झालं ? हा सुरा कुणाचा ? बघ. तुझाच ना ?

सगुणाः—होय माझाच ! मींच काढून ठेवला होता तो सुरा. कदाचित् माझ्या हातून तो अविचार झालाही असता. पण तोंवर दरोडेखोर आंत आपल्या घरांत घुसले. आणि तिजोरीच्या किल्ल्यांसाठीं त्यांनीं हा घाव घातला. मामाजी, तुमच्यापुढं खोटं बोलायला माझी जीभ कधीं उचलली नाहीं, कधीं उचलणार नाहीं. खरंच, नाहीं हो नाहीं, मामाजी, हा पतीचा खून नाहीं !

**राघुअण्णा**:–असो. [ निर्धारानं ] आतां कांहीं असो. बाजी गेला तो गेला, तुला आणखी घालवून मी आतां काय मिळविणार? सूनबाई जा, हा पतीचा खून असो, नाहीं तर सतीचा शाप असो, कांहीं असलं तरी तुला आतां वांचविलीच पाहिजे. घरासाठीं, कुळासाठीं आणि माझ्या घराच्या वाढत्या अंकुरासाठीं! जा ऊठ, तो सुरा तेवढा आतां चटकन् लपव. कुठं-तरी टाक लवकर. जा जा, पहिलं काम तें कर. नाहींतर...

**सगुणा**:–मामाजी!

**राघुअण्णा**:–जा, कांहीं बोलूं नकोस. अगोदर तो सुरा लपव. [ जाते. ] बाज्या, बाज्या, माझ्या पोरा रे–[ रडत बाजीच्या प्रेताला मिठी मारतात. ]

## पडदा पडतो.



ग्रामीण प्रकाशन संस्था
भिलवडी ( जि. सातारा )

दीड रुपया



ग्रामीण प्रकाशनें

: कादंबरी :

★ एका आईची लेकरं

: नाटक :

★ रक्ताचं नातं

: निबंध-संग्रह :

★ चिमणचारा

: प्रमुख विक्रेते :

जोशी ब्रदर्स बुकसेलर्स अँण्ड पब्लिशर्स
अप्पा बळवंत चौक, पुणें २.